मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें.

# महाराष्ट्रकाव्यग्रंथ.

११.

# पंचतंत्र.

---

विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्‌सी.,

यांनीं

'महाराष्ट्रकवि' या मासिक पुस्तकांत छापून प्रसिद्ध केला.

---

शके १८२९.

# पंचतंत्र.

## प्रथम तंत्र–मित्रभेदुनामें.

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीमार्तंडभैरवाय नमः । अविघ्नमस्तु । निर्विघ्नं कुरु जगदीश । अथ पंचोपाख्यानं लिख्यते ।

मनवे वाचस्पतये शुक्रांगिरसे पराशरायाथ ।
चाणक्याय च विदुषे नमः ससूताय च शुकाय ॥ १ ॥
सकलार्थशास्त्रसारं जगति समालोक्य विष्णुशर्मेदम् ।
तंत्रैः पंचभिरतुलैश्चकार सुमनोहरं शास्त्रम् ॥ २ ॥

पूर्वि महिळारोप्य नाम नगरि । तेथें अमरशक्ति नाम राजा होता । तयासि तिघे पुत्र । तयांचिं नामें । वसुशक्ति । अनंतशक्ति । उग्रशक्ति । ऐसे तिघे जण प्रबुद्ध थोर जाले । परंतु मूर्ख जाणौनु । राजा मंत्रियांसि बोळाउनि म्हणे । हे माझे पुत्र मूर्ख जाले । तरि हे पढवा । आणि राज्या योग्य करा । यैसें सांघितलें । मग मंत्रियें विचारुनि । विष्णुशर्मा नामें ब्राह्मणु । बोलाविला । तयाचे सांभाळिं रायें तिघे पुत्र केले । विष्णुशर्मा बोलिला । राया तुझे पुत्र सा मासां । प्राज्ञ पढते राज्या योग्य करिन । न करि तरि माझी दुर्दशा करावि । यैसें म्हणौनि राजपुत्रा पढवावया नेलें । उक्तं च ।

अनंतपारं किल शब्दशास्त्रं स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः ।
यत्सारभूतं तदुपार्जितव्यं हंसो यथा क्षीरमिवांबुमध्यात् ॥ ३ ॥
श्रीमद्रटे वससि यक्षिणि निर्मलाशये, भक्तानुकंपितजगत्रयगीतकीर्तिः ।
लोकस्य वांछितफलानि ददासि देवि, तुभ्यं नमोस्तु सकलासुरवृंदवंद्ये ॥ ४ ॥

हा श्लोक पढौनि । राजपुत्रांसि नीतिशास्त्र पंचोपाख्यान सांघे । म्हणे तंत्रें पांच । त्यांचिं नामें । मित्रभेदु १ । मित्रसंप्राप्ति २ । काकोलूकीय ३ । लब्धप्रणाशु ४ । अपरीक्षितकार्य ५ । ऐसिं पांचहि तंत्रें । प्रथम मित्रभेदु सांघैन । याचा प्रथम श्लोक ।

वर्धमानो महांस्नेहो सिंहगोवृषयोर्वने ।
जंबुकेनातिलुब्धेन पिशुनेन विनाशितः ॥ ५ ॥

राजपुत्र पुसति । विष्णुशर्मा सांघे । म्हणे दक्षिणदेशिं महिळारोप्य नाम नगरँ । तेथें वर्धमान नामें वेव्हारा । तो अतिसंपन्न । पूर्वोपार्जितधन । त्याचि वृद्धि करावि । म्हणौनि । श्लोक पढे ।

उपार्जितानामर्थानां त्यागमेव हि कारणम् ।
तडागोदकसंस्थानां परिवाहमिवांभसाम् ॥ ६ ॥

दैववशादुपपन्ने सति विभवे नास्ति यस्य भोगेच्छा ।
न च परलोकसमीहा भवंति धनपालका मूर्खाः ॥ ७ ॥

यैसें विचारौनु । बरवें सुमुहूर्तिं । वाजतां गाजतां । सोइरां स्वजनीं बोळवीतु । शर्करा आणावया निघाला । गाडियेवरि वस्तु घातली । तये गाडियेसी । नंदिकु संजीवकु बैल दोन्हि । बरवे कौतुकाचे हौसिंचे जुंपिले । आपण गाडियेवरि बैसला । वाटे जातां संजीवकु तळियामध्यें कर्दमीं रुतला । त्याचा पावो दुखवला । यैसें देखौनि वेव्हारा दोनि दिवस तेथें राहिला । दुःख केलें । परि तो बैल नुटेचि । तये वेळिं श्लोक पढे ।

न स्वल्पस्य कृते भूरि नाशयेन्मतिमान्नरः ।
एतदेव हि पांडित्यं स्वल्पाद्भूरिरक्षणम् ॥ ८ ॥

यैसें म्हणौनि तया संजीवकु बैलापासिं । दोघ जण राखण ठेविले । म्हणे बैल उठेलि । इतुकेयानें बैल आणावा । ऐसें सांगौनु आपुण पुढां चालिला । तंवं तें अरण्य भयानक देखौनि बैल संडुनि गेले । आणि बैल मेला म्हणौनि वेव्हारियासि सांघितिलें । मग तो वेव्हारा । बैलाकारणें दुःख कारि । म्हणें । उत्तम मोलाचा गुणवंताहि होता । मग पुढें मथुरेसि गेला । राणि तो बैल वांचला । उक्तं च ।

अरक्षितं तिष्ठति दैवरक्षितम् । सुरक्षितं दैवहतं विनश्यति ।
जीवत्यनाथोऽपि वने विसर्जितः । कृतप्रयत्नोऽपि गृहे न जीवति ॥ ९ ॥

यैसा तो बैल आयुष्येंकडुनु वांचला । चिखलाबाहेरि निघाला । मग तो यमुनेचे थडियेरि हरियालि चरे । आणि यमुनेचें पाणि पी । मोटा दृढ जाला । रडि माथेनें घांसे । आणि थोरें शब्देंकरुनि गर्जे । यैसा तये वनिं असतां । ते वनिंचा राजा पिंगळकु नामें सिंह । तो आपुले

परिवारेसि पाणीं प्यावयासि यमुनेसि येतां । तंवं त्या वेलाचा सादु आईकौनि । साशंकित जाला । म्हणे माझेया परिस सादु थोरु जाला । तरि सादुकार कैसकैसा असेलि । म्हणौनि पाणि न पितां । परतौनि जाउनि वडाखाले बैसला । तंवं करटकु आणि दमनकु । कोल्हे दोघे बंधु । येकमेकांतें बोलति । म्हणति आम्हीं मंत्रिपुत्र हों । परि प्रस्तुत अधिकारु नाहिं । म्हणौनि दमनकु श्लोक पढे ।

सदानंदमदस्थोपि मातंगपिशिताशनः ।
असंपन्नेप्सिताहारः किं तृणान्यत्ति केसरी ॥ १० ॥

म्हणे हा यैसा आमुचा राजा सिंह्व । पाणि न पितां जाउनि । वडाखालि बैसला । तंवं करटकु म्हणे । आम्हीं दाणि मंत्रि न हो । तन्हि नाथिला व्यापार काइसा । म्हणौनि श्लोक पढे ।

अव्यापारेषु व्यापारं यो नरः कर्तुमिच्छति ।
स एव निधनं याति कीलोत्पाटीव वानरः ॥ ११ ॥

दमनकु पुसे । करटकु सांघे । म्हणे कोण्हे येके धनवंतें । नगराबाहिर देवालय करुं आदरिलें । तंवं मध्यान्ह कालि वाटे जेवावयासि घरासि गेले । तंवं तेथें वानरयुथ आलें । इकडे तिकडे हिंडति । तंवं येकु वानरु खेळाडु । दुफोडि खांब करितां मध्यें खिळ घातलि होति । ते त्या वानरें देखिली । म्हणे येथें खीळ कोण्हें कां घातलि असे । म्हणौनि उकलूनि । ते खील हालउं हालउं उपडिलि । तयाचें वृषण वोळकौंट होते । तें खील काढतां । दुफोडि खांब त्यामध्यें सांपडलें । त्यासि कळ लागलि । मग तो वानर मृत्यातें पावला । तरि नाथिलें करितां येसें होये । तंवं दमनकु म्हणे । आम्हि मंत्रिपुत्र । राजसेवक । म्हणौनि श्लोक पढे ।

यो नात्मनि न गुरुषु न च बंधुवर्गे
दीने दयां न कुरुते न च साधुवर्गे ।
किं तस्य जीवितफलं हि मनुष्यलोके
काकोपि जीवति चिरं च बलिं च भुंक्ते ॥ १२ ॥

करटकु म्हणे । आम्हि प्रधान नहो । आधारें कोण कार्य । तंवं दमनकु म्हणे । उक्तं च ।

अप्रधानः प्रधानः स्यात्पार्थिवं यदि सेवते ।
प्रधानोप्यप्रधानः स्याद्यदि सवाविवर्जितः ॥ १३ ॥

म्हणौनि मिं पिंगळकु राजा आपणातें वश करीन । आणि मिच प्रधान होईन । हा तरि बिहाला । मूढमति । भयकारण पुसौनि । राजनीति सां प्रकारिची असे । संधि १ । विग्रहो २ । यान ३ । आसन ४ । संश्रय ५ । द्वैधीभाव्य ६ । यैसी राजनीति सां प्रकारिचि असे । यामध्यें येक प्रकारिं राजा वश करीन । आणि मि प्रधानु होईन । तंवं करटकु म्हणे । तुंवां राजसेवा जाणितिली नाहीं । आणिक तुं राजनीति नेणसि । आणि राजा बिहाला हे केविं जाणसि । जन्हि राजा तुज पुसेलि तरि तुं काये उत्तर देसि । तें सांघें । तंवं दमनकु म्हणे वैराटा जाता धौम्यें राजनीति पांडवांसि सांघितिली । ते मियां आईकिली । ते मी जाणतु असें । राजा पुसेलि तरि तयासि उत्तर संभवैल तें देईन । म्हणौनि श्लोक पढे ।

उत्तरादुत्तरं वाक्यं वदतां संप्रजायते ।
सुवृष्टिगुणसंपन्नाद्बीजाद्बीजमिवापरम् ॥ १४ ॥

राजा बिहाला तें मियां जाणितलें । उक्त च ।

आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषणेन तु ।
नेत्रवक्त्रविकारेण ज्ञायतेऽतर्गतं मनः ॥ १५ ॥

उदीरितोऽर्थः पशुनाऽपि गृह्यते । हयाश्च नागाश्च वहंति चोदिताः ॥
अनुक्तमप्यूहति पंडितो जनः । परेंगितज्ञानफला हि बुद्धयः ॥ १६ ॥

जे काळिं जें बोलणें आणि जें करणें पुढिलासि गत उत्तर देणें । यैसें अवघें मि जाणतु असें । तंवं करटकु म्हणे । हो कां । तुं राया-पासिं जाये । तुज अवघें बरवें हो । कार्यसिद्धि हो । यैसा आशिर्वादु दिधला । इतुकेनि दमनकु सिंहापासि चालिला । तंव पिंगलकु रायें दमनकातें खटाटोपें येतां देखिला । मग राजा काठिकारातें म्हणे । आमुचे जुने मंत्रियाचा पुत्रु येतो । त्यासि तुं आडवी काठि घालुं नको ।

येउनि उचित स्थानिं बैसों दे । तंवं तो दमनकु येउनि । रायासि जोहार करुनि उचित स्थानिं बैसावेला । रायें दक्षिण करें परिवंसिला । आणि म्हणितलें । दमनका निकेन आहासि । तंवं दमनकु म्हणे जि राउळिचं पांयांचं प्रसादेनं कृपेनं निकें असों । तंवं तो रावो म्हणे । बहुता दिवसा देखिलासि । तरि काये म्हणतोसि । तंवं दमनकु म्हणे । कांहिं विनवणें नाहिं । परि प्राप्त काळासारिखें कांहिं बोलावें । उक्तं च ।

दंतस्य निष्कोषणकेन राजन् कर्णस्य कंडूयनकेन वापि ।
तृणेन कार्यं भवतीश्वराणां किं नाम वाच्यं वदता नरेण ॥ १७ ॥

म्हणौनि मि अप्रयोजकु ऐसि हेळणा न करावी । कां जे बोलिलें असे ।

एवं ज्ञात्वा नरेंद्रेण भृत्यैः कार्या विचक्षणाः ।
कुलीनाः शौर्यसंपन्ना भक्ताः सक्ताः क्रमागताः ॥ १८ ॥

तंवं पिंगळकु म्हणे । यैसें कैसें तुंवां बोलिलासि । तुं आमुचा मंत्रिपुत्र जुनां बहुतां काळांचा । तंवं दमनकु म्हणे । कांहि विनति असे । तंवं सिंहु म्हणें, । सांवें । तंवं दमनकु म्हणे जि राजकार्य बहुतां देखतां न विनवावें । नीति बोलिली असे ।

षट्कर्णे भिद्यते मंत्रश्चतुष्कर्णः स्थिरो भवेत् ।
तस्मात्सर्वप्रयत्नेन षट्कर्णं वर्जयेद् बुधः ॥ १९ ॥

हें आईकौनि सभेचे अवघे परते सरले । मग दमनकु म्हणे । गोसावि तान्हेले पाणि न पितां । वडाखालि कां बैसलें । तंवं सिंहु म्हणे । कांहि नाहिं । दमनकु म्हणे । तरि सुखें असावें । परि नीति यैसि जे ।

दारेषु किंचित्पुरुषेण वाच्यं किंचिद्वयस्येषु सुतेषु किंचित् ।
सर्वेऽपि ते प्रत्ययिनो भवंति सर्वं न सर्वस्य च संप्रकाश्यम् ॥ २० ॥

तंवं पिंगळकु म्हणे । हा बुद्धिवंतु असे । यासि सांगों । म्हणे । दमनका । हा शब्दु जाला तो तुंवां आईकिला । तन्हि जैसा सादु तैसाचि पराक्रमु असैल । म्हणौनि हें स्थळ सांडावें । तंवं दमनकु म्हणे । सादु

आईकिलिया जाणें हें निकें नोहे । शब्दु नानाविधु । शंख । मृदंग । कपाट । भेरी । इतुकीं मियां पुर्वि जाणितिलिं असेति । उक्तं च ।

पूर्वमेव मया ज्ञातं पूर्णमेतद्धि मेदसा ।
अनुप्रविश्य विज्ञातं यावच्चर्म च दारु च ॥ २१ ॥

पिंगलकु पुसे । दमनकु सांगे । म्हणे येकु कोल्हा भुकेला वनिं हिंडतां जुनि रणभूमि होति । तंव तेणें तेथें शब्दु आईकिला । तेणें तो बिहाला । मग मनिं विचारि । म्हणे पळों किं हें काये आहे तें पाहों । म्हणौनियां दुरुनि पाहे । तंव ढोलु । वारियानें वृक्षाचे पल्लव फांटे लागले । तेणें तो वाजिन्नला । तें जाणौनु । मग तेथें जाउन । आपण हि कौतुकें दोहिंकडे वाजविलें । मग मनिं विचारिलें । जे यामाजि मेदमांस अपार असेलि । म्हणौनि येकीकडे फाडुनि आपण भीतरि रिघाला । तंव तेथें कोरडें चर्म असे । आणि लांकुड पोकळ म्हणौनि जाणतु असे । तरि मजसारिखा पाइकु तुम्हापासिं असतां भे कासियाचें । मि तया शब्दापासिं जाईन । काये आहे तें पाहौनि येईन । तंव गोसाविं इये स्थळींच राहावें । मग जें करणें तें करूं । यैसें म्हणौनि दमनकु त्या शब्दापासिं गेला । तंव तो बैलु । यैसें जाणौनि मनिं विचारिलें । म्हणे यासि आणि सिंहासि संधि-विग्रहो करूं । इतुकेन राजा वश्य होईल । उक्तं च ।

सदापदाहृतो राजा भोग्यो भवति मंत्रिणाम् ।
अत एव हि वांच्छंति मंत्रिणः सापदं नृपम् ॥ २२ ॥

तंव तो पिंगलकु मनिं विचारि । म्हणे मियां वोखटें केलें । जे या दमनकासि अधिकारु नाहिं । आणि मानु हि केला नाहिं । तरि तो तेया प्रचंड शब्दाकरविं मज मारविल । त्यासि अकस्मात् आणौनि मजवरि घालिल । तरि मग काये पां कीजे । तरि आतां हें स्थळ सोडुं । म्हणौनि तें स्थळ सोडुनि । आणिके ठांई जाउनि दमनकाचि वास पाहात बैसला । तंव तो येकलाचि येतां देखिला । मागुति जाउनि स्वस्थळिं बैसला । तंव तो दमनकु आला । म्हणे जि तें मियां देखिलें । तंव पिंगलकु म्हणे । साच । तंव दमनकु म्हणे । उक्तं च ।

सर्वदेवमयो राजा मुनिभिः परिगीयते ।
तस्माद्देवस्य देवत्वं व्यलीकं नैव कर्हिचित् ॥ २३ ॥

म्हणे जि साच देखिला । तयातें मियां पुसिलें तुं कोणु । तंवं तो म्हणे । मि ईश्वराचा नंदि । देवें हें वन मज दिधलें । तंवं म्यां तयासि म्हणितिलें । हें वन पिंगलकु सिंहु राजा तयाचें असे । मग तेणें म्हाणितिलें जें तयासि मैत्री करुं । दोघें हि सुखें असों । तऱ्है गोसांवियांचि अभयभाषा जालिया । मिं तयासि तुम्हापासिं आणिन । ऐसें लटिकें चि सांवितलें । तेणें तो सिंहु संतोषला । आणि दमनकाचि स्तुति करौनु वानिलें । बोलिलें असें ।

मंत्रिणां सति संभेदे भिषजां सन्निपातिके ।
कर्मणा व्यज्यते प्रज्ञा स्वस्थे को वा न पंडितः ॥ २४ ॥

ऐसें म्हणौनि दमनकासि सिंहें मानु केला । तंवं तौ दमनकु मागुता संजीवकापासिं जाउनि म्हणे । अरे ढोरा । तुं वृथा कां डरतोसि । पिंगलकु सिंहु येथें आथि । तयातें तुं नेणसि । तंवं तो म्हणे पिंगलकु कोणु । तंवं येरु म्हणे तो अति बळिकटु थोरु जुंझारु । मारिजेसिल । इतुकेयाने कळेलि । आपण चि जाणसि । इतुकेनि संजीवकु बिहाला । मग दमनकासि म्हणे । तुं जें म्हणसिल तें मि करिन । तंवं दमनकु म्हणे तुज आणि पिंगळकासि सख्य करीन । मग तुतें तयापासि नेईन । मियां तयाचि अभयभाषा मागितली असे । तरि तुज आणि पिंगलकातें ऐक्य जालियां तुं मातें न मानिसि । तऱ्हि तुं नाशु पावसिल । तंवं वसु बोले ऐसें मिं न करि च । तंवं दमनकु म्हणे । जे प्रधानपण अवघें दुर्घट असे । उक्तं च ।

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके । जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ॥
इति महति विरोधे वर्तमाने समाने। नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥ २५ ॥

म्हणौनि तुतें आणि सिंहातें सख्य निश्चयें होये। ऐसें न मनि पारें यत्नातें करिन । राजसभेसि जाणारियें राजमान्यें करुनि गर्व न करावा । कां जें बोलिलें असे ।

न पूजयति यो गर्वाद्यथाचित्तं नृपाश्रितान् ।
संप्राप्नोति पदभ्रंशं भूपतेर्दंतिलो यथा ॥ २६ ॥

संजीवकु पुसे । दमनकु सांघे । पृथ्वीमंडळाचां ठांई । वर्धमान नामें नगर । तेथें अमरशक्ति नाम राजा । तयाचा प्रधानु दंतिलु । तो गर्वोत्कर्षेंकरुनि वर्ततु असे । तयाचिये कन्येचा विवाहु जाला । अवघें परिवारेंसिं राजा आणि नगरांतिले नागारिक जेउं बोलाविले । तंव गोरंभकु नामें केरसुणिकारु । तो हि आवंतिला । तो जाउनि वरिले पंक्तिस बैसला । त्यासि देखौनि प्रधानें गचि देउनि बाहिर घातिला । ऐसें प्रधानें अवमानिलें । मग गोरंभकु मनि म्हणे । याचेया प्रधानपणाचा अधिकारु फिटैल तरिच मि मायेचा पूतु । तऱ्ही तें कैसेनि होईल । ऐसी विचारणा करुं लागला । तंवं एके दिवसिं । रावो सेजारिं निजेला असे । झाडितां गोरंभकु ऐसें बोलिला । म्हणे । प्रधानु रायाचे राणितें आलिंगतु असे । परि यासि रायाचें भय नाहिं । तें रायें ऐकौनि तयातें रावो पुसे । म्हणे । हा रे गोरंभका । काये बोलिलासि । तंवं तो गोरंभकु म्हणे । मि कांहिं नाहिं बोलिलों । निदसुरा रात्रि जुंवं खेळतां जागत होतों । काये बोलिलों तें मिं नेणें । मग रावो मनिं च विचारि । म्हणे निजलें मातलें । त्याचे मनिं जें असतें । तेंचि बोलतें । तरि याणें देखिलें असे तें चि बोलतु असे । स्त्रिया विजाति दुराचारिणी । हें सुखें चि असैल । ऐसें आईकौनु दंतिलाचें प्रधानत्व फेडिलें । दारवठाकारें दार प्रतिषेधिलें । तंवं तो दारवटां निस्तेज होउनि बैसला । तंवं दंतिलु म्हणे । रावो मज कां कोपला । मियां काये अपराधु केला । ऐसें मनिं विचारितु बैसला । तंवं तो गोरंभकु दारवठकारासि बोलिला । म्हणे अगा ये दारवठकारा । तुं दंतिल प्रधानासि । भीतरि कां रिघों नेदिस । तुं यासि भीत नाहिंस । हा परम समर्थ । हां गा माझिये परि तुज करिल । तुज गचि देउनि बाहेरि घालिजसि । ऐसें दंतिलु आइकौनि मनिं म्हणे । मज रावो कोपला । तें याचेंच करणें घडलें असे । मग दंतिलु घरासि जाउनु । तो गोरंभकु । बोलाउनि आणिला । तयासि फार सन्मानु केला । लेणिं लुगाडिं दिधलिं । इतुकेन गोरंभकु सुखि होउनि म्हणे । मागुतें प्रधानपण तुझें तुतें देववितों । म्हणौनि आपुले घरासि गेला । तंव तो गोरंभकु मागिले परि सेजार झाडितां ऐसें बोलिला । जे पाहा हो हा राजा मूर्ख । हागतां चिभडिं

चाळकें खातु असे । तें हि रायें ऐकौनि पुसिलें । तंव तो म्हणे मिं निद्सुरा । काये बोलिलों बरळ तें मिं नेणें । मग रावो मनिं विचारि । म्हणे । मागिल वेळे बोलिला । तें हि ऐसें चि असैल । अप्रस्तुत । म्हणौनि रायें दंतिलु प्रधानासि बोलाउनि सन्मानु केला । आणि प्रधानपण दिधलें । तरि ऐसें असे । मग तये संजीवकें । अवघें साच निकें मानिलें । मग दमनकें तो संजीवकु पिंगळकु सिंहापासिं आणिला । दोघांसि सख्य जालें। मग त्या संजीवकातें पिंगलकें पुसिलें । तेणें आपुला वृत्तांतु अवघा सांघितला । म्हणे मिं गाडा जुंपिलों होतों । तेथुनि जाला वृत्तांतु सांघितला । मग त्या दोघांसिं प्रीति जाली । मग संजीवकें सिंहाचा अरण्यधर्म सोडविला । ग्रामधर्मिं प्रवर्तविला । मग तयां दोघांसि गोठि करितां कोण्हि हि जवळि येवों न सकेंसें जालें । तंवं करटकु आणि दमनकु ते हि जवळि येवों न होतिसें जालें । यावारि दमनकु आणि करटकु भुका मरति । प्रधानपण हि नाहिं । मग एकमेकां गोठी करिती । तंवं दमनकु म्हणे । हा दोषु आम्हीं आन केला । तयाचें फल भोगितसों । उक्तं च ।

जंबुको हुडुयुद्धेन वयं चाषाढभूतिना ।
नापिती परकार्येण त्रयो दोषाः स्वयंकृताः ॥ २७ ॥

करटकु पुसे । दमनकु सांघे । म्हणे कोण्हे एके स्थलिं मठ एकांतिं एकु होता । तेथें एकु संन्यासी असे । तयासि शिष्य धन देति । तें धन तयापासिं बहुत सांचलें । तें धन तेणें मात्रेमध्यें घातलें असे । ते मात्रा काखेहुनि परति न ठेवी । कोण्हासि हि विश्वासेना । ऐसिया धनवंतातें देखौनि । आखाडभूति नामें चोरु । तो मनिं विचारी । म्हणे याचें धन कैसे परि चोरुं । हा तरि विश्वासेना । आणि मठु तरि सुबंधु । घट्टि । तेथें रिघु नाहिं तरि आतां तयासि येणें रितीं विश्वासउं । तो विश्वासलियां त्याचें धन हातासि येईल । ऐसें म्हणौनि तया तपोधनापासिं जाउनि दंडवत घातलें । तंव येरु म्हणे तुं कोणु । तो म्हणे जि मिं संसारासि उबगलों। संसार पुत्र कलत्र मित्र हें अवघें लटिकें स्वप्नवत् । तरि स्वामिनं मजवरि दया करावी। मज उपदेश देयावा । जेणेंकरि मिं संसार तरे । म्हणौनि पुढति दंडवत

केलें । ऐसें आईकौनि तो संन्यासु म्हणे । ऐसें तुझें मनिं जाणितलें । तरि तु भला ।

> शूद्रो वा कश्चिदन्यो वा चांडालो वा जटाधरः ।
> दीक्षितः शिवमंत्रेण सभस्मांगो शिवो भवेत् ॥ २८ ॥

तरि मिं तुज अनुग्रहो करिन । परि तुंवां आमुचे मठामध्यें निद्रा न करावि । मज एकांतु होवा । आणि तुज हि एकांतु होवा । म्हणौनि मठाचे दारिं कोंपि करुनि असावें । तें आखाडभूतिनें मानिलें । तयासि तपोधनें उपदेशु दिधला । मग तो आखाडभूति तपोधनाचे हातपाय चुरि । आणिक हि उदंड शुश्रूषा करि । निद्रासमईं बाहेरि जाये । तपोधन काखेचि मात्रा विसंभेना । ऐसें असतां । आणिकें एकें गांविचेनि शिष्यें तपोधन आवंतिला । दोघे हि प्रभातसमईं निघाले । वाटेस जातां । नदी एकी देखिली । तेथें राहिला । तंवं तो तपोधन मात्रा ठेउनि बाहिर भूमिस दूरिं गेला । आणि आखाडभूतिस म्हणितिलें । तुं दूरि बैसौनि दुरुन मात्रा राखैं । स्पर्श करुं नको । ऐसें सांगौनु गेला । इतुकेन आखाडभूति ते मात्रा घेउन पळाला । तंवं त्या तपोधनें हागतां दोनि मेंढे झुंझतां देखिले । हागतु हागतु ते झुंझ पाहे । त्यां दोघां मेंढियांसि झुंझतां । तयांचें माथांचं रक्त पडे । तें कोल्हा येकु चाटि । एकु वेळ लवकरि परता न सरेचि । दोन्हिचे धडिकेमाजिं सांपडला । तो कोल्हा मेला । तपोधन तें कौतुक पाहौनि आला । तंवं तो आखाडभूति आणि ते मात्रा नेदखे चि । इतुकेनि मूर्च्छागतु पडला । आखाडभूति आखाडभूति ऐसें बोभाइला । म्हणे चांडाळा वंचिलें । तुंवा ऐसें काये केलें । म्हणौनि वाट भूलला । तंवं जातु असे । तंवं अस्तमान जालें । येकु गांव पावला । तंवं गांवांबाहिर साळियाचि बाईल मद्यमांस घ्यावया हाटा जाति असे । तिचा दादुला सांगाति । तयांतें भेटला । तयांतें म्हणे मि तुमचा अतिथि ।

> स्वागतेनाग्नयस्तृप्ता आसनेन शतक्रतुः ।
> गोविंदः पादशौचेन अन्नेन तु प्रजापतिः ॥ २९ ॥

हें आईकौनि तो साळि । आंबुलियेतें म्हणे । या अतिथितें वरासिने । गोसावियांचे पाय धुय । आसन शयन भोजन दे । तंवं मि मद्यमांस

घेउनि येईन । तंवं ते हरखेली । ते परपुरुषरत असे । तंवं ते साळियेन आपुलिया पढियंतियातें आठविलें । मग म्हणे जावों तेथें । म्हणौनि निघाली । आणि तपोधनासि तुटके खाटेवरि बैस म्हणितलें । मि आपुले सखियेसि भेटौनि येति असें । मिं जंवं येईन तोंवरि तुंवां येथें असावें । ऐसें म्हणौनि शृंगारु केला । मग निघाली। जाति असे। तंवं भ्रतारु येतां देखिला । तयातें येतां देखौनियां मागुती घरां आंतु रिघाली । शृंगारु फेडिला । तें साळियें देखिलें ।

करस्पंदोऽबरत्यागस्तेजोहानि: सरागता ।
वारुणीसंगजावस्था भानुनाप्यनुभूयते ॥ ३० ॥

तो येउनि तियेतें ऐसें म्हणे । रांडे सिनळि केउति जाति होतिस । कोणापासिं । मागिल तुझें मियां बहुत आईकिलें । तें आजि मियां आपुले डोळां देखिलें । आतां तुज सिक लाविन । तुं सांघ वहिली । तंवं ते म्हणे । मिं तुजपासिं येत होतियें । तें तो नाइकेचि । लांकुडवरि सुबंध मारिलि । आणि खांबेसिं बांधिलि । साळि उन्मत्त होउनि पासला पडला । तंवं तिचि कुंटणी न्हाविण तियेपासिं येउनि तियेतें म्हणे । जें तुझा सिनळु तुझी वाट पाहातुसे । तंवं ते म्हणे मातें पाहेसि ना । तंवं ते न्हाविण म्हणे । सिनळीचे ऐसे धर्म नव्हेति । उक्तं च ।

यदि भवति दैवयोगात्पुमान् विरूपो हि बंधकी रहसि ।
भव्यमपि तदपि कष्टं निजकांतं वंचयत्येव ॥ ३१ ॥

तंवं ते सिनळि म्हणे । मिं वांधलिये कैसोनि येणें । तंवं न्हाविण म्हणे । तुं मातें बांध । आणि तुं जाये तया आपुलियें सिनळापासिं । म्हणौनि साळिन सिनळीतें सोडिलें । आणि न्हाविण कुंटणीनें आपणातें बांधविलें । मग साळिन शृंगारु करुनि निघालि । तंवं तो साळि मागुता उठिला । म्हणे । रांडे सिनळि केउति जातीस । तंवं ते न्हाविण बोलु बोळखैल म्हणौनि नोबले चि । म्हणे रांडे कां गे बोलेसि ना । म्हणौनि रागें उठैला । आणि तियेचें नाक कापिलें । मागुता मातला निजेला । तंवं पढियंतियासिं रमौनि साळिन मागति आलि । म्हणे सखि बरवी अससि । तंवं न्हाविण म्हणे नाकेंविण बरवी होये । मग न्हाविणीतें सोडौनु साळिन खांबेसिं

बांधिजेलि । इतुकेन साळी उठैला । म्हणे रांडे केउति जातिस । हातपाय कापीन । तंवं ते सिनळि म्हणे । नाथा मिं सिनळि नहो । पतिव्रता होयें तरि तुटिलें नांक मागुतें येईल । ऐसें म्हणौनि भ्रतारातें म्हणे । देखैं माझें मुख सनासिक असे । तंवं तो दीपु घेउनि पाहे । तंवं छेदिलें नाक मुखेंसि असे । मग म्हणे चुकलों । आतां ते न्हावीण काये करि । प्रभातें घारिं येउनि निजेलि । तंवं तिचा भर्तारु राउळाहुनि घरा परतेला । भार्येतें म्हणे शस्त्र काढुनि देई । तंवं ते शिनळी तयाकडेसिं शस्त्र फेंकि । तेणें तो रागें ठेला । आणि शस्त्र तियेचे आंगावरि अंधारिं फेंकि । तंवं ती बोभाये । म्हणे येणें माझें नाक तोडिलें । मग राजपुरुषीं न्हावियातें धरुनि राजेयापासिं नेला । तयानें न्हावियासि जिवें माराया आज्ञा दिधलि । इतुकें देखौनु तो तपोधनु तया राजेयातें म्हणे । अरे अन्यावो करितोसि । मग तेणें निका वृत्तांतु सांघितला । त्यावरि राजेयानें न्हावीणीतें मारुनि तया न्हावियातें सोडिलें । इतुकेन तो तपोधन कनक आणि कांता यांचेया लोभातें सांडौनि स्वाश्रमातें गेला । परि धूर्तें आखाडभूतिनें वंचिला । उक्तं च ।

सुप्रयुक्तस्य दंभस्य ब्रह्माप्यंतं न गच्छति ।
कौलिको विष्णुरूपेण राजकन्यां निषेवते ।। ३२ ।।

करटकु पुसे । दमनकु सांघे ।

× × × × × × ×

( येथोन कौलिकानें विष्णुरूपानें राजकन्येचा उपभोग घेतला या कथेचा पूर्वभाग त्रुटित आहे. त्याचा सारांशः—"पूर्वी एका नगरांत एक कौलिक व एक रथकार असे दोघे जिवलग मित्र राहत असत. त्यांनीं एकदां यात्राप्रसंगानें देवदर्शनाकरितां आलेल्या यौवनलावण्यसंपन्न अशा राजकन्येस पाहिलें. तिचे रूपास मोहित होऊन कौलिक मूर्च्छित झाला. रथकारानें कष्टानें त्यास सावध केलें. मूर्च्छेचें कारण समजल्यावर रथकारानें कौलिकास, ज्यावर सायुध भगवान् विष्णु आरूढ झाले आहेत असा कळीचे योगानें आकाशांतून इच्छिले ठिकाणीं घेऊन जाणारा गरुड करून दिला. या गरुडयंत्राचे साह्यानें कौलिकानें रात्रीचे

वेळीं राजकन्येचे मांदिरांत जाऊन तूं पूर्वजन्मींची राधा असल्यामुळें तुझे समागमाचे इच्छेनें मी क्षीरसमुद्रांतोन लक्ष्मीचा त्याग करून येथें आलों आहें. मनुष्यांशीं बोलणें तर राहोच पण त्यांना माझें दर्शनही दुर्लभ यामुळें मला तुझे पित्याजवळ तुझी मागणी करितां येत नाहीं. तरि गांधर्वविवाहानें माझी इच्छा तूं पूर्ण कर; नाहींतर तुझें पितृकुल शापानें भस्म करीन, असें सांगितलें. बालपणचे निष्कपटपणानें तिला हा विष्णुच आहे असें वाटून (व भीतीनें) ती कौलिकाचे म्हणण्यास कबूल जाली. ती रात्र त्यांनीं विलासोपभोगांत घालविली. सकाळीं कोणास न कळतां कौलिक गरूडयंत्रानें निघून गेला. पुढें प्रत्यहीं रात्रीं येऊन राजकन्येचा उपभोग घेऊं लागला. राजकन्येचे शरीरावयवांवरून ती पुरुषोपभुक्त आहे, असें अंतःपुररक्षक कंचुकींचे ध्यानांत येऊन त्यांनीं ती गोष्ट राजाचे कानीं घातली. राजानें राणीकडून शोध करविला. कन्येनें विष्णूनें आपणांस गांधर्वविधीनें वरिल्याबद्दल सर्व हकीकत कळविली. रात्रीं कन्येचे मंदिरांत गुप्त ठिकाणीं बसलेल्या राजा व राणी यांणीं आकाशमार्गानें गरूडावरून कौलिकाला येतानां पाहिल्यानें तो विष्णुच आहे अशी त्यांस खात्री वाटून आपणांस विष्णु जांवाई जोडल्यामुळें धन्यता वाटली. पुढें राजानें जांवयाचे जोरावर सम्राट विक्रमसेनास करभार देणेचें बंद केलें." नंतरचा मजकूर पुढें आला आहे. ).

विक्रमसेनातें प्रतिवर्षिं करभारु देति । तेणें आपुले दूत मागों पाठविले । तंवं तो नेंदिच । मग तेणें विक्रमसेनु प्रौढवर्धनावरि सबळु वाहौनु आला । तेहिं देशु विध्वंसिला । नगर जाळिलें । तेव्हाळिं रायें लेकि बोलावलि । म्हणे विष्णुचेंनि बळें । मियां विक्रमसेनासि विग्रहो केला । तरि तुं आजि राउळांतें विनवी । मग तिया कुमारिनें रात्रि विनविलें । म्हणे राउळासारिखा साहाकारी । आणि माझेया पितियावरि आणिकु राजा चालौनि आला । तंवं तो कौळिकु म्हणे । आम्हि किति दैत्य अवलीळाचि वधिले । हें तंवं मनुष्यें । मारितां सायास काईसा असे । ऐसा लटिकाचि गर्वें बोलिला । ते कुवंरिन रायापुढें तैसेंचि सांवितलें । तेणें तो रावो हरिखेला । मग तो कौळिकु चिंता करि । म्हणे हां गा सर्वेश्वरा । आतां धांवणिया धांवें । तुं माझा कुंवासा । माझे आंगि तुं

संचरें । ऐसें म्हणौनि गरुडातें स्मरिलें । तंवं तया गरुडाचें आसन थरारिलें । तंवं तया गरुडें विष्णुतें विनविलें । म्हणे जि कौलिकु । लटिकेंचि गरुडयंत्र करुनि । मावेचें विष्णुरूप करुनि । ते राजकन्येतें भोगितसे । तिये कुंवरीचा बापु विष्णु जंवाई म्हणौनि तया बळें आना रायांसि विग्रहो केला । कोण्हातें लेखिना । ते राजे चालौनि आले । तेहिं नगर वेढिलें । तंवं ते राजकुंवारीन कौलिकु विनविला । जें तुंवां पारखें दळ मारावें । मग तेणें मनिं विचारिलें । जें राजकन्येविण मरण । आणि झुंझतां मरण निकें । तरि आतां मरिजे । परि झुंझों । ऐसें विचारौनि तो झुंझैल । आणि मारिजैल । तरि गोसांविं आणि मिं मारिलों ऐसें होईल । मग कोण्ही देवतांतें नमनिति । तंवं तो विष्णु म्हणे । हें साच । तरि गरुडा तुं गरुडिं संचरें । आणि मि कौळिकाचे शरिरिं संचरैन । आणि चक्र चक्रिं संचरैल । तैसेंचि तेंहिं केलें । प्रभाते कौळिकु झुंझों निघाला । तेणें चक्र सोडिलें । तेणें तो पारखा रावो मारिला । आणि चक्र मागुतें परतौनि आलें । तेणेंकारि ते अवघे राजे त्यापासिं वश्य जाले । शंखनादु जाला । तो आईकौनु ब्रह्मा तेथें आला । म्हणे देओ पृथ्वीस कां आले । पारि तो हि हें विंदाण नेणे चि । ऐसा सुप्रयुक्त दंभु ब्रह्मा हि नेणें चि । ऐसें हें दमनकाचें बोलणें आईकौनि करटकु म्हणे । सुखें तुं तेथें जाये । तुज पंथु बरवा हो । मग तो दमनकु तया पिंगलकु सिंहापासिं जाउनि । नमस्कार करुनि बैसला । तंवं सिंहु तयातें म्हणे । बहुतां दिवसां देखिलासि । तारि कोण काज तें सांघैं । तंवं दमनकु म्हणे । चोखटें चि । परि गोखटें । यालागिं सांघों आलों । उक्तं च ।

सुलभाः पुरुषा राजन् सततं प्रियवादिनः ।
अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोता च दुर्लभः ॥ २३ ॥

तंवं पिंगलकु म्हणे सांघैं । तंवं दमनकु म्हणे । हा संजीवकु मजपुढें बोलिला । म्हणे सिंहाचें बळ मियां जाणितिलें असे । आतां तयासि मि मारीन । आणि राज्य अवघें मिं च घेईन । तरि राउळाचे आम्हि सेवक । जुने पूर्वापार । म्हणौनि गोसावियांपासि सांघावया आलों । उक्तं च ।

कंटकस्य च भग्नस्य दंतस्य दलितस्य च ।
अमात्यस्य च दुष्टस्य मूलादुद्धरणं स्मृतम् ॥ २४ ॥

तंवं संजीवकु निर्भय होउनि असे । तंवं पिंगलकु म्हणे । मियां अभयदान तयासि दिधलें असे । दमनकु म्हणे आम्हि जुने सेवक । आमुचें म्हणितिलें न करिस । तरि तुज अवघड कठिण होईल । आतां माझें बोलणें आइकें ।

व्याघ्रवानरसर्पाणां यन्मया न कृतं वचः ।
तेनाहं दुर्विनीतेन गर्दभेन विनाशितः ॥ ३५ ॥

पिंगलकु पुसे । दमनकु सांघे । म्हणे कोणे एके नगरीं । यज्ञदत्तु नामें ब्राह्मणु असे । तो दुर्बलु । तयातें ब्राह्मणीनें म्हणितिलें । तुम्हि कांहिं उदीम न करा । आम्हि अवघें भुकें मरत असों । तंवं तो चहुकडे हिंडों निघाला । वाटेस जातां येके अरण्यि पातला । तयासि तृषा लागलि । म्हणौनि उदकाकारणें हिंडतां । तंवं एकु अड देखिला । तणें झांकिला असे । तया आंतु पाहे तंवं देखिलें । व्याघ्रु । सर्पु । वान्नरु । सोनारु । ऐसे चौघे तया अडामध्यें पडिले असति । ते तया यज्ञदत्तु ब्राह्मणें देखिले । ते हिं तो ब्राह्मणु देखिला । मग चौघे हि तयातें म्हणति । आमुतें या अडांतुनु बाहेरि काढि । तंवं तो विचारि । म्हणे यांसि बाहिर काढितां पुण्य होईल । म्हणौनि तेणें आधि व्याघ्रु काढिला । तेणें म्हणितिलें तुं माझा प्राणदाता । मिं मथुरेचे डोंगरीं असें । तेथें तुं आलिया । मिं तुझे उपकाराचा प्रत्युपकार करीन । परि या सोनारा तुं बाहिर काढुं नको । तंवं तो सर्पु आणि वान्नरु हि काढिले । तंवं ते म्हणति तुं सोनारु बाहिर काढुं नको । आणि आमुतें अवघड वेळेसि स्मरावें । मग पाठि तो सोनारु हि काढिला । तंवं तो सोनारु हि म्हणे । मजपासिं तुवां यावें । तुझें मिं उत्तीर्ण होईन । तंवं तो ब्राह्मणु हिंडतु हिंडतु मथुरेसि गेला । तंवं तेथें वान्नरु भेटला । तेणें त्या ब्राह्मणासि स्वागत केलें । बरविं फळें दिव्यें आणौनु दिधलिं । ते डोंगरीं व्याघ्रु हि भेटला । तेणें त्या ब्राह्मणासि सोनियाचे अलंकार दिधले । ते अलंकार घेउनि त्याच सोनारापासिं गेला । तंवं तो तया ब्राह्मणासि नोळखे चि । ब्राह्मणें खुण सांवितलि । मग वोळखिलें । ब्राह्मणासि बैसों घातलें । आणि पुसे काय काज । तंवं तया ब्राह्मणें अलंकार दाखविले । तंवं ते अलंकार तयाच नगरीच्या राजकुंवराचे त्याच सोनारें घडिले होते । ते नेमस्त वोळखिले ।

मग मनिं विचारिं । व्याघ्रें राजकुंवरु मारिला । अलंकार ठेविले होते । ते या ब्राह्मणासि प्रत्योपकाराकारणें दिधले । तंव तो सोनारु जाउनि राउळीं सांघे । म्हणे जि राजकुंवरु जेणें मारिला । तो चोरु मिं दाखविन । म्हणौनु तो ब्राह्मणु सोनारें राजदूतांपासिं दाखविला । म्हणे एणें राजपुत्र मारिला । आणि अलंकार घेऊनि आला असे । तो ब्राह्मणु राजदूतीं धरुनि बहु बडविला आणि धरुनि रायापासिं नेला । तंवं रायें म्हणितिलें । यासि उदैक सुळिं द्या । म्हणौनि बंधन करौनि ठेविला । तंव त्या ब्राह्मणें रात्रिं सर्पु स्मरिला । तंवं तो तत्काळ आला। म्हणे काये आज्ञा । तंवं तेया ब्राह्मणें अवघा वृत्तांतु सांघितला । तंवं तो सर्पु म्हणे । मिं रायाचे राणिस डंखिन । तुजवांचुनि नुतरे । तुं हात लावतां चि उतरैन । ऐसें सांगौनु सर्पें ते राणि डंखिली । तया सर्पाचें विख कांहि केलियां नुतरे । तंवं तया ब्राह्मणें म्हाणितिलें । मी उतरिन । मग तो ब्राह्मणु रायें सोडिला । तयाचा हात लागतां चि सर्पु उतरला । मग रायें तया ब्राह्मणासि सन्मानु केला । मग रायें तयां लेणियांचें वृत्त पुसिलें । ब्राह्मणें अडापासुनि अवघें सांघितलें । मग तो सोनारु नेउनि गांवाबाहिरि घातला । आणि तया ब्राह्मणासि धन गांव दिधलें । मग तेणें आपुलें कुटुंब आणविलें । सुखें असों लागला । म्हणौनि कोण्हाचा विश्वासु न करावा । आणि भृत्यें राजा व्यसनावेगळा करावा । न करि तरि सेवकासि बाधु लागे । तंवं पिंगलकु म्हणे । हा बैलु तण खाये । आणि आम्हि भुकेलिया ढोर खावों । तरि हा आमुचें काये वोखटें करिल । तंवं दमनकु म्हणे । हा अप्रयोजकु । आणि गोसावी गजेंसि झुंझतां घाये लागतिल । हा जवळि असतां । याचे शेण-मुतापासाव किडे पडतिल । तुमचे घाईं सलतिल । ते किडे तुमचें खतां आंतु रिघातिल । तेणेकरि गोसावि नाशु पावतिल । म्हणौनि हा दुष्ट । याचा संगु वोखटा । याचेनि संगें तुम्ही नाशु पावाल । उक्तं च ।

न ह्यविज्ञातशीलाय प्रदातव्यः समाश्रयः ।
दंदुकस्य च दोषेण हता मंदविसर्पिणी ॥ ३६ ॥

सिंहु पुसे । दमनकु सांघे । म्हणे एका रायाचा मंचकावरिल पासोडा । तया आंतु मंदविसर्पिणी नामें उ । ते पुत्रपौत्रेंसिं असतां ।

तेथें एकु ढेंकुणु वारेयानि पडला । तो तिये उनें देखिला । ते तयातें म्हणे । तुं येथुनि वेगां जाये । तुज योग्य हा ठावो नव्हे । तंव तो म्हणे मि तुझा अतिथि । म्हणौनियां तुझेनि संगें प्रसादें । रायाचेनि रुधिरें सुखि होईन । तंव ते उ म्हणे । तुं अग्निमुख । परि तो म्हणे मि तुझा पाहुणा । तुं मातें दवडुं नको । या रीती बहुत आकारें तिनें झाडितां । नवजायेचि । तिस समजाउनि राहिला । मग तिया हो कां म्हणितिलें । परि रावो चांग निजेलिया । पाईचें रगत पिआवें । तंव रावो कोपला । मग सेवकांहिं वाति लाउनियां पाहिलें । तंव ते उ देखौनि मारिली । ढेंकुणु तरि निघौनि गेला । याकारणें विश्वासु कोणाचा न करावा । आणिक आम्हि जुने बहुत काळांचे । ते आम्हासि दवडिलें । आमुचें म्हणितिलें न करिस । आणि कोणिह जाणितिले ना देखिले आईकिले ते जवळि केले । येणेंकरुनि तुं नाशु पावसि । उक्तं च ।

त्यक्ताश्चाभ्यन्तरा येन वाह्याश्चाभ्यन्तरीकृता: ।
स एव मृत्युमाप्नोति मूर्खश्चंडरवो यथा ॥ ३७ ॥

सिंह पुसे । दमनकु सांघे । कोणे एके नगराबाहेरि कोहंकी । चंडरवनामें कोल्हा असे । तो भुकेला म्हणौनि गांवाआंतु रिघाला । तंव सुणी पाठिं लागालें । पळतां निल्हारियाचे वोझां पडला । तो निळा बरवा देखौनि । अवघिं श्वापदें तयातें भीति । म्हणति हा आमुचा राजा । म्हणौनि तयातें मानिति । तेणें कोल्हेनें गर्वेंकरुनि अवघे कोल्हे दवडिले । सिंहु व्याघ्रु मंत्रि सेवक केले । एके वेळे कोल्हे अवघे दराडिवरि उभे ठाकौनि भुंकों आदरिलें । तंव तया चंडरवासि हि भुंक न धरेचि । तंव तो हि कान वरुते करौनि भुंकों लागला । मग सिंहादिकीं कोल्हासा जाणौनि मारिला । तंव तो पिंगळकु म्हणे । साच मातु । परि संजीवकु केधवां वोखटें करित । ऐसें दमनकातें पुसिलें । तंव तो म्हणे । तो शिंगें समोर करुनि येईल तेधवां जाणावें । ऐसें दमनकें पिंगळकासि सांघौनि । मग संजीवकापासि गेला । तंव तो पुसे सुखें समानें असा । तंव दमनकु म्हणे । सेवकांसि सुख कैचें । उक्तं च ।

कुमित्रसेवा न कदापि कार्या । पश्यांडजं पद्मवने प्रसुप्तम् ॥
धनुर्विमुक्तेन शरेण भिन्नं । कुमित्रयोगादिह्पूरुषेण ॥ ३८ ॥

संजीवकु पुसे । दमनकु सांघे । म्हणे कोण्हे एके सरोवरिं । मंदरकु नामें हंसु असे । तेथें डुडुळु एकु आला । तयातें हंसु म्हणे । तुं एथें कां आलासि । तंव तो म्हणे । तुजसिं मैत्री करुं आलों । तुं निका निर्मळ म्हणौनि । तंव तेणें हंसें हो कां म्हणौनि राहाविला । ते दोघे सुखें असतां । तंव डुडुळु म्हणे । मिं आपुलिया ठायासि जाईन । तंव तुवां तेथें एकु वेळ भेटों यावें । ऐसें म्हणौनि डुडुळु आपुलिया ठायासि गेला । तंव तो हंसु कितेकां दिवसां डुडुळुकासि भेटावया गेला । तो ढोलांतुनि निघाला । रात्रि उलुकें स्वागत केलें । रात्रि दोघे गोठी करितां निद्रा केलि । तेथें वाटसरु वाणिये वेव्हारे रात्रि वासिनले होते । ते प्रभाते स्वार होतां डुडुळकें बोखटा सादु केला । वेव्हारा शब्दवेधि । तेणें विंधिलें । तंव उलूक ढोला आंतु रिघाला । हंसु निजेला होता । तेणें शरें विंधिला । मेला । तंव तो संजीवकु म्हणे । सिंह्व चांग मधुर बोले । आणि भीतरिं विखासारिखा । आणि मी तणखाईर । आणि सिंह्व मांसाहारी । मज आणि तयासि कैसें मित्रत्व । मग संजीवकु आणिक म्हणे । कटकटा क्षुद्रमंडळांतु आंतुडलों । उक्तं च ।

बहवः पंडिताः क्षुद्राः सर्वे मांसोपजीविनः ।
कुर्युः कृत्यमकृत्यं वा उष्ट्रे काकादयो यथा ॥ ३९ ॥

दमनकु पुसे । संजीवकु सांघे । कोण्हे एके नगरिं । सागरदत्त नाम वेव्हारा । तो देशाउरें निघाला । तंव विकटु नामें कऱ्हा । तयावरि भारु बहुत घातला । तो भारें दडपला । आणि रानामध्यें बैसला । उठवितां नुठेचि । तेव्हां तो रानिं संडौनि गेला । तो दैववशास्तव उठिला । चारा खाये पाणि पी । मोठा जाला । तंव ते वनिं मदोत्कट नामें सिंह्व । तेणें पुसिलें । तुं कोणु । तंव तेणें आपुलें वृत्त अवघें सांगितलें । मग तया सिंहें तयां कऱ्हेयासिं अभयदान दिधलें । तो सुखें असों लागला । तंव एके वेळे सिंह गजेसिं युद्ध करितां । तयाचे दांतांचे घाये लागले । तेणेंकारि दिवस दोनि उपास पडले । मग तया सिंहें आपुले सेवक । वाघु वेउळु कोल्हा काउळा । तयांतें म्हणितिलें । मजलागिं आहारु मेळवा । कांहिं मारुनि आणा । ते वेळे काउळा आणि कोल्हा । विचारिति । म्हणति । हा कऱ्हा मारिजे तरि इतुकेयानें अवघियांसि पारणें होईल ।

म्हणौनि कोल्हा सिंहापासें आये । म्हणे जि कन्हा मारुं । आणिक कांहि नेदखों । तंव सिंह्व कोपौनि म्हणे शरणागतु । तयासि मियां अभदान दिधलें असे । तंव कोल्हा म्हणे । जरि तो आपणाचि म्हणे तरि मारितां दोषु नाहिं । सिंह्व म्हणे तरि होये । इतुकेयानें काउळा उभा ठाकौनि सिंहातें म्हणे । जि मातें मारुनि तुम्हि पारणें करा । कांहिं एक क्षुधा हरेलि । आणि मज परलोकु होईल । तंव काउळियातें कोल्हा म्हणे । तुं सर परता । तुं पंचनखी । आणि अल्पु । तुतें गोंसावि न खाति । म्हणौनि कोल्हा आपुण तैसेंचि म्हणे । त्याचि परि वाघु म्हणे । त्याचि परि कन्हा म्हणे । कन्हा म्हणतखेवों । वाघें झोंबौनि मारिला । मग तें अवघे कन्हेयातें खाति । म्हणौनि गिधु राजा आणि परिवार हंसु तें भलें । परि हंसु राजा आणि परिवार गीधु हें वोखटें । तेथें जिणें नाहिं । उक्तं च ।

यदस्ति जंबुकः पार्श्वे तीक्ष्णतुंडश्च वायसः ।
तेनाहं वृक्षमारूढः परिवारो न शोभते ॥ ४० ॥

दमनकु पुसे । संजीवकु सांवे । कोण्हे एके नगारें । देवगुप्त नामें वाढई । तो आपुले आंबुळीसवें सांगातें बरवी सिदोरी बांधौनु । राना दळवाडें खांडुं गेला । तेथें सिंह्व देखिला । पळवेना ऐसें जाणौनु । सिंहासमोर जाउनि म्हणे । सांघातिया माझिये ये । ये सिदोरिचें अन्न खाये । तंव सिंह्व म्हणे । आम्हि मांसाहारी । तंव वाढई म्हणे । हें चाखोनि पाहे पां । तो सिंह्व खाये । तंव बरवें गोड । मग तया सिंहें वाढयासि अभय दिधलें । तंव वाढयें म्हणितलें । निच तुवां येकलेंचि यावें । ऐसा तो सिंहु निच ये । ते सिदोरिचें अन्न खाये । ऐसें दोघांसि मित्रत्व जालें । तंव तया सिंहाचे सेवक । काउळा । कोल्हा । ते सिंहातें म्हणाति । जि आम्हि भुका मरत असों । तुम्हि तरि पारधि न करा । तंव सिंहु वाढयाचें मित्रत्व सांवे । तंव ते म्हणति तो वाढई मारुं । इतुकेनि आम्हांसि तृप्ति होईल । तंव तो सिंहु कोपौनि म्हणे । आमुचा मित्र । शरणागतु । तयासि न मारों । मग काउळा कोल्हा विचारिति । कैसें कीजे । [ पुढील मजकूर तृटित आहे. ] त्या रुखावरि गेला । निब्ररु जाला । तंव त्या वेलाचेनि आधारें । पारधी वळघौनी । आंविशाळां पाश घातले ।

आणि आपणु निघौनि गेला । तंव ते हंस अवघे फांसा पडले । तंव तो वृद्ध हंस म्हणे । माझें म्हणितिलें न करा च । तरि अवघे फांसा पडिलेति । तरि आतां ऐसें करा । मेलेति ऐसे होउनि पडा । इतुकेयानें तुम्हि अवघे मेलेति ऐसें पारधी जाणौनु । अवधियांतें रुंखाखालिं टाकील । मग तो रुंखाखालिं पारधी उतरतां देखाल । इतुकेयानीं अवधिं एकसरेंचिं उडौनि जावें । तंव पारधिहि आला । तेणें अवघे पक्षी मेलेसें जाणोनि अवघे रुंखाखालि टाकिले । इतुकेनि ते अवघेचि उडौनि गेले । [येथून पुढील मजकूर तृटित आहे.] तन्हि आतां आपुण पैल तया रुखासि जावों । तेथें एकु वृद्ध पक्षी असे । तयातें बुद्धि पुसों । तो सांवैल तेंवि करा । मग अवघे पक्षी तेथें जाउनि । अवघा वृत्तांतु तयासि सांघितला । तंव तो म्हणे । आमुचा गोंसावी । तेथें जाउनि एकवेळ तयासि सांवौनु । तो अवघें पारिपत्य करिल । मग तेहिं पक्षिंहिं तैसेंचि केलें । तंव गरुडें पुसिलें । तिहिं टिटवीटिटवेयांचा वृत्तांतु सांवितला । आणि म्हणति । तुज ऐसा गोंसावि आम्हासि असतां । समुद्रं ऐसा पराभव केला । जे आम्हि चांचुनं पोट भरूं । तें देखौनि आम्हांसि ऐसें केलें । म्हणौनि श्लोक पढति ।

> प्रच्छन्नं किल भोक्तव्यं दरिद्रेण विशेषतः ।
> पश्य भोजनदौर्बल्याड्डुः केसरिणा हतः ॥ ४१ ॥

गरुडु पुसे । वृद्ध पक्षी सांवे । मेंढिया वनिं चरतां येकु मेंढा चुकला । तयातें मुरडिवां सिंगांचा भयानकु देखौनि सिंहु बिहाला । आणि पळाला । दुरुनि जंव पाहे तवं तण चरतु असे । मग तो तण-खाईर ऐसें जाणौनु सिंहें मारिला । तंव विष्णुनें गरुड बोलावुं पाठविला । तंव गरुड नयेचि । म्हणौनि दुतें सांगितलिया । मग विष्णु म्हणे । आम्हिचि जावों । गरुडु वृद्ध सेवकु पाइकु । रागें ठेला असे । तन्हि आम्हिचि जावों । ऐसें म्हणौनि विष्णु गरुडापासिं गेला । मग गरुडें दंडवत करुनि । टिटवीयांचा वृत्तांतु निवेदिला । मग विष्णु कोपौनु समुद्राकारि सांकुवे आणविलिं । तेणेंकारि टिटवाटिटवी सुखि जालिं । तंव तो संजीवकु दमनकातें पुसे । मज सिंहासि युद्ध कोणे समईं । तंव तो म्हणे । सिंहु मोळि टेकुनि पुंस हालवितु शिळेवरि बैसला देखसिल । तेधवां तुतें मारिल । ऐसें म्हणौनु । दमनकु करटकापासिं

गेला । तंव तो पुसों लागला । येरु म्हणे मियां भेदु केला । तंव करटकु ह्मणे साच । तंव तो म्हणे फळेंकरि जाणिजैल । आणि आपुलें कार्य सर्वथा करावें । कां जे बोलिलें असे ।

परस्य पीडनं कुर्यात्स्वार्थसिद्धयै च पंडितः ।
मूढबुद्धिर्न भक्षेत वने चतुरको यथा ॥ ४२ ॥

करटकु पुसे दमनकु सांघे । कोण्हे एके वनिं वज्रदंष्ट्र नामें सिंहु । तयाचे मंत्रि तिघ । क्रव्यमुखु वेउळ । चतुरकु कोल्हा । शंखवर्णु कन्हा ऐसे तिघ असतां । गजेंसिं जुझतां । सिंहु घायाळ जाला । आणि गुंफेसि बैसला । तंव वेउळातें सिंहें म्हणितिलें । कांहीं हरिणरोंहि वनां आंतु पाहा । मीं मारीन । इतुकेनि आपुणियां तृप्ति होईल । ते परते जाउनिं विचारिति । तव कोल्हा म्हणे । एकु उपावो आथि । मग शंखवर्णु कन्हेयापासि जाउनि ह्मणे । गोसांवि मेलियां मग आपुण अवघे मरोनु । तरि तुं-तें कांहीं म्हणितिलें । तरि तुं आईकैं । तंव तो म्हण सांधैं तंवं तो म्हणे । तु आपलें शरिर दुणि वाढिनें दे । येविषिं तुज अंतरिं म्हणिजे ओली देवों । तुज दुणें प्राप्त होईल । तें गोसांवियांसि पथ्य होईल । ते तया कन्हेयानं मानिलें । तिहिं जाउनि सिंहापासिं संवादिलें । तो कन्हा तंव कोल्हा विचारि । एकलाचि मांस खावों । मग तेणें सिंहु नदिस स्नानासाठिं पाठविला । तंवं वेउळासि म्हणितिलें । तुं कन्हें खायें । मिं जाणें । तेणें घांसु घेतला । इतुकेनि तयातें म्हणितिलें । तुंपळ । पैलु सिंहु आला । ऐसा तो वेउळ पळाला । मग कोल्हा खाउं लागला । तंवं सिंहु आला । तेणें कोल्हेयातें खातां देखिलें । मग तो कोल्हा पळाला । तयाचे पाठिं सिंहु लागला । तंव तया वाटा कन्हि घेउनि वाणियां येतु देखिला । तंवं तो कोल्हा सिंहातें म्हणे । पैलु यमु आणि कन्हेयाचे वाडिल दुणें शरिर मागों आलेति । तें आईकौनि सिंहु पळाला । मग तो सगळा कन्हा एकल्या कोल्हियानेंच खादिला । मग तो संजीवकु विचारि । म्हणे मिं काये करूं । पळों तरि दुष्ट श्वापदें मारिति । तरि आतां सिंहाच पासि जावों । म्हणौनि चालिला । तंव जेसा कांहि दमनकें सांवितला होता । तैसाचि सिंहु बैसला देखिला । आणि सिंहासि हि दमनकें सांवितला होता । तैसाचि संजिवकु हि सिंहे येतां

देखिला । मग तया संजिवकासिं पिंगळकु सिंहें नखाग्रानें हाणितला । आणि सिंहातें हि संजीवकें शिंगें डिवियेलें । मग ते दोघेहि रक्तभाबाळ देखौनि । करटकु दुःख कारि । आणि दमनकातें म्हणे । तु अधमु । मंत्रि नव्हेसि । मंत्रु करुं नेणासिच । एवढें कुकर्म । दंड केला । चौथा उपावो दंडु । ऐसें नीति बोले । मंत्रु ऐसा कीजे । उक्तंच ।

नग्नःश्रवणको दग्धः पार्थिवोभिमुखीकृतः ।
आत्मा चैवोन्नतिं नीतो बळभद्रेण मंत्रिणा ॥ ४३ ॥

दमनकु पुसे । करटकु सांवे । कौशाळ देशिं अयोध्या नाम् नगारिं । तेथें दशरथु नाम राजा । तयाचा मंत्रि बळिभद्रु । तेणें पारकें राज्य घेणें म्हणौनि । प्रधानु परिवारेसिं पाठविला । तो गेला तंव तिये नगारिं नग्नश्रवणु नामें खवणा भाटु आला । तो अनंत विद्या जाणे । मनिं चिंतिलें तें सांघे । तेणें ते नगरिंचा लोक वश्य केला । हें रावो ऐकौनि तयासि । आपणा-पासिं बोलाउनि पुसे । म्हणे तुं मनिं चिंतिलें तें जाणसी । तंव तो म्हणे फळें जाणिजैल । ऐसा तो रायापासिं नीच गोठिकरि । आणि अनंत विनोदु दाखवि । ऐसा तेणें राजाहि वश्य केला । एकु वेळ उसिरा येउनि रायातें म्हणे । हें शरिर आपण मठिं ठेउनि दिव्य शरिरें स्वर्गासि गेलों होतों । तुतें देव पुसत होते । म्हणाति रायातें आशिर्वादु सांघावा । नित्य स्वर्गासि जात असों । हें आईकौनि राजेयानें अवघा व्यापारु सांडिला । सर्वदा तयाचि जवळि असे । तंव तो मंत्रि अवघियांतें जिंकौनि आला । तंव खपणा राजेयापासिं सभेसि बैसला देखे । राजा तया नग्नकातें वानी । तंव राजेयानें नग्न श्रमणकाची गोष्टि मंत्रियापुढें अवघी केली । तंव तो मंत्रि म्हणे । जेथें हा शरिर ठेउनि स्वर्गा जातु असे । तो मठचि जाळुं । इतुकेंनि हा दिव्यशरीरें रायापासिं असैल । मंत्रि म्हणे परियसा । तंव राजा पुसे । बळभद्रु मंत्री सांवे । नगारिं एका देवशर्मा नामें ब्राह्मणुं असे । तयासि लेंकरुं नसे । तंव तयाची ब्राह्मणी दुःखित बोले । म्हणे मरिजे तें चांग । पारि लेंकुरेंविण जिणें वोखटें । तंव तो ब्राह्मणु म्हणे । असि । पुत्रु होईल । मग ते गरोदर होऊनि कोनिं निवालि । सांपु जाला । सोइरिं सांडा म्हणति । पारि ते सांडिना । पेटारां घालुनि दुधें तुपें चढ-विला । मग ते भर्तारातें म्हणे । याचा विवाहु करावा । तो ब्राह्मणु म्हणे ।

सांपासि कोणु देईल । तंव ते म्हणे मीं मरैन । मग तो ब्राह्मणु दुरि सोइरे होते । तेथें जाउनि सोइरियातें म्हणे । माझेया पुत्रासि तुम्हि आपुलि कन्या द्यावी । तेंहिं दिधलि । वऱ्हाडि आणिकु लेंकु आणिला । लग्न लाविलें । मग तिंहिं तो सांपु दाखविला । तें जाणौनि नोवरी श्लोकु पढे ।

सकृज्जल्पंति राजानः सकृज्जल्पंति साधवः ।

सकृत्कन्या प्रदीयेत त्रीण्येतानि सकृत्सकृत् ॥ ४४ ॥

वऱ्हाडि पुसति कन्या सांवे । पुष्पकु नाम पुंसा बोलिका । बरवें बोलों जाणें । इंद्रें कोतुकें हातावरि बैसविला । तंव तेथें यम आला । यमातें देखौनि पुंसा पळाला । तंव इंद्रें तयासि पुसिलें । म्हणे तुं कां पळालासि । तंव तो पुंसा म्हणे । मि यमातें देखौनि पळालों । तंव तो इंद्र मुख्यदेव यमातें म्हणे । या पुंसेयातें न मारावें । तंव यमु म्हणे काळु जाणें । तंव काळातें इंद्रें म्हाणितलें । या पुंसेयासि न मारावें । तंव तो काळु म्हणे । मृत्यु जाणे । मग मृत्यूपासिं इंद्रु गेला । मृत्यु देखतखेवों सांपु मेला । म्हणौनि तुम्हि कांहि न बोलावें । मज सांपु भर्त्तारु निका । तयासमवेत तियते वऱ्हाड करुनि पाठविलें । तंव ते नोवरि ते पेटारि पुढें घेउनि मंचकावरि निद्रा करि । तंव तिया एके दिवसिं पुरुषु एकु पेटारां आंतुनु आपुलेपासिं येतां देखिला । तंव ते म्हणे तुं कोणु । तंव तो म्हणे मिं तुझा पति । म्हणौनि पेटारा बाहिरि निघाला । तियेसि प्रत्ययो जाला । ते सुख पावलि । मग तिया अवघा वृत्तांतु सासुससुरियांसि सांगितला । तंव तो एकु दिवसिं पेटाराबाहिरि निघौनु पुरुष होउनि स्त्रियेपासिं निजेला । इतुकेनि तयाचेनि बापें तो पेटारा जाळिला । मग तयाचें दिव्य शरिर जालें । मग ते अवघि सुखि जालिं । तैसें एया खपणातें करुं । मग तैसें चि नग्नक्षपणकातें केलें । तंव तो जळौनु मेला । तरि जे बुद्धिवंत ते ऐसें कार्य करिति । परि तुवां वोखटें केलें । तुज उपदेश करणें हें निकें नोहे । बोलिलें असे ।

नानाम्यं नाम्यते दारु न शस्त्रं क्रमतेऽश्मनि ।

सूचीमुख्या इवाशिष्ये नोपदेशः सुखावहः ॥ ४५ ॥

दमनकु पुसे । करटकु सांवे । सीतकाळिं आगिया देखौनि आगि म्हणौनि पानिं झांकिला । आगि एकु वानरु फुंकुं लागला । सूचीमुखी

नाम चिडी । तयातें म्हणों लागली । हे आगि नव्हे । हा आगिया असे । तंव तो नाईके । वेळा दौनि तिनं म्हणितिलें । परि नाईके चि । मज कानाजवळि जाउनि बोभाइलि । तंव त्या वान्नरासि रागु आला । तेणें ते चिडी हाता धरुनि शिळेवरि उपटिली । तंवं करटकु म्हणे ऐसें आहे । तुझें अति पांडित्य एणें रीतीचें असे । उक्तंच ।

धर्मबुद्धिर्दुष्टबुद्धिर्दावेतौ विदितौ ममः ।
तयोस्तु नाडिपांडित्यं विना धूमेन मारितः ॥ ४६ ॥

दमनकु फसे । करटकु सांघे । नगरीं एके धर्मबुद्धि आणि दुष्टबुद्धि ऐसे दोवे वाणियांचे पुत्र मित्र होते । ते धन जोडावयासि देशांतरां निघाले । तेथें तेंहिं ठेवा दिनारि सोनटके देखिले । मग गांवासि येतां नगराबाहिरी तें धन पुरौनि ठेविलें । शतें दोनि आपुलिया घरासि आले धर्मबुद्धि विश्वासला । सुखें असतां । दुष्टबुद्धि मनिं विचारि । रात्रि एकला जाउनि तें द्रव्य घेउनि आला । आणि रिति हांडि रात्रिच तेथें नेउनि ठेविली । एकु दिवस धर्मबुद्धितें म्हणे । तें धन आणुं म्हणौतु । दोवेजण धन काढावयासि गेले । तंव तेथें रितें भांडें असे । आंतु धन नाहिं । इतुकेनि दुष्टबुद्धि रडे । बोभाये । मग ते हांडि फोडिली । आणि धर्मबुद्धितें म्हणे । तुवां हें धन नेलें । ऐसे दोघे वेवाद करितां । राजसभेसि गेले । तंवं ते एकमेकातें म्हणति । तुवां नेलें । सभासदिं दिव्य व्यवहारु विचारुं आरंभिला । म्हणति दिव्य द्यावें । तंव दुष्टबुद्धि श्लोकु पढे ।

विवादे दर्शयेत्पत्रं पत्राभावे तु साक्षिणः ।
साक्ष्याभावात्ततो दिव्यं प्रवदन्ति मनीषिणः ॥ ४७ ॥

तरि मिं वनदेवता साक्षि देवविन । तंव सभासद श्लोकु पढति ।

अत्यंजोपि यदा साक्षी विवादे संप्रजायते ।
नतत्र विद्यते दिव्यं किं पुनर्वनदेवता ॥ ४८ ॥

ऐसें म्हणौनि अंतरि बोलि घेउनि घरासि पाठविलें । तंव दुष्टबुद्धि घरा जाउनि आपुलिया बापातें म्हणे । जेथें धन रोविलें होतें तेथें शमीचें

ढोल असे । तेथें रिघौनि तुवां साक्षि द्यावि । तंव तो म्हणे । ऐसें करितां दोघेहि नाशु पावोनु । उक्तं च ।

उपायं चिंतयेत्विद्वान पायमपिचिंतयेत् ।
पश्यतो बकमूर्खस्य नकुलै र्भक्षिता बकाः ॥ ४९ ॥

दुष्टबुद्धि पुसे । पिता सांघे । एके रुखिं बक अपार असाति । तेथें तया रुखाचे ढोलिं एकु सांपु असे । तो तया बकांचि पिलीं खाये । तंव तो बकु पाणियाकांठिं डोळे मिटौनि दुःखें रडतु असे । तें एका कीरवलें देखिलें । तया बकातें पुसे । म्हणे तुं कां रडतोसि । मामो तुं ऐसा कां । तंव तो म्हणे । आम्हि जे रुखिं असो तेथें सांपु असे तेणें माझिं पिलीं खादिलिं । आणिकांचिहि खादिलिं । म्हणौनि कांहि उपाव जाणत अससिल तरि सांवैं । तंव तेणें मनिं विचारिलें । जें हे बक आमुचे वैरी । तरि हे नाशु पावेति । आणि तोहि सांपु नाशु पावे । ऐसा उपावो यासि सांगों । म्हणे मुंगसासि दाखउनु । ढोलांतु घालि । इतुकेन मुंगुस तया सांपातें मारिल । खाईल । तंव तया बकें तैसेंचि केलें । सांपु त्या मुंगुसें मारिला । आणि तयाचि वाटे रुखावरि वेंघौनि बक हि अवघे खादले । तैसें आह्मांसि होईल । पुढिलां वोखटें चिंति तें तयासिच होये । प्रथम वोखटें । ऐसें सिकवितु । परि तो नाईकेचि । बापु रात्रि नेउनि ते ढोलांरिं घातला । मग प्रभातें सभासद आणि ते दोघे वेवादिये । तेथें गेले । तंव दुष्टबुद्धि थोरें शब्दें बोभाईला । म्हणे अवो वनपतिदेवते जैसें तैसें वदावें । तंव तो ढोलां आतुनु म्हणे । धर्मबुद्धि लटिका । दुष्टबुद्धि साच । ऐसे बोल ऐकतखेवों । सभासद धर्मबुद्धितें म्हणति । तुं लटिका जालासि । तंव तो म्हणे तुम्हीं नावेक राहा । म्हणौनि तया ढोलासि आगि लाविलि । तंव तो आगिनें करपला । बोभाउनि उठिला । दुष्टबुद्धिचा बापु ढोलाबाहिरि निघाला । इतुकेनि दुष्टबुद्धिस सिकलाविली । आणि धर्मबुद्धिस धन देवविलें । तंव करटकु तया दमनकातें म्हणे । ऐसें तुझें पांडित्य । भयरूप कुळनाशु । आम्हां वोढवलासि । आणिक तुं मूर्ख । तुझा विश्वासु करूं नये । म्हणौनु श्लोकु पढे ।

तुला लोहसहस्रस्य यत्र खादंति मूषकाः ।
श्येनको निरहस्तत्र बालकं नात्र संशयः ॥ ५० ॥

दमनकुं पुसे करटकु सांघे । कोण्हे नगारें । वाणियाचा पुत्र हांडु नामें । तयाचें धन दैववशें गेलें । मग तो मनिं विचारि । हे लोखंडाचि तुळा सहस्रपाटां जोखे । ऐसी होती । ते लखमण सायाचांघरिं पुरुनि ठेविलि । आणि तयासि निरविली । मग तेथुनि निघाला । तो देशाउर करूनि आला । तुळे पुसिलि । तंव लक्षमण सावो म्हणे । ते उंदिरें खादिलि । तंव तो म्हणे तुं काये कारिसिल । म्हणौनि उगाच राहिला । मग लखमाणसायातें म्हणे । मिं स्नान करुं जात असे आपुला पुत्रु धनदत्तु । वाटिले तिळ घेउनि सांगातें पाठवि । तेणें पाठविला । तेणें तया धनदत्तातें एकें विवारिं घालौनि । वरि शीळ ठेविली । आपण स्नान करूनि आला । तंव लखमणसावो पुत्रातें नेदेखाचि तयातें पुसिलें । तंव तो म्हणे थडिये बैसला होता । तो ससाणेयानें नेला । तंव तो ह्मणे बारा वर्षांचा पुतु ससाणे यानें कैसा नेला । ऐसे दोघे भांडत धर्मसभेसि आले । दोघातें पुसिलें । इतुकेन हांडुनें तुळेचा वृत्तांतु सांघितला । येरें पुत्राचा वृत्तांतु सांघितला । हांसौनि सभासदिं हांडुचि तुळा देवविली । मग हांडुनें लक्षमणसायाचा पुत्र आणौनु देवविला । मग करटकु म्हणे । तुझेनि शब्दें पिंगलकु सिंहें संजीवकु बैल मारिला । तरि तुझा संसर्गु आम्हां वोखटा उक्तं च ।

मातारप्येका पिताप्येको मम तस्य च पक्षिणः ।
अहमुनिभिरानीतः सच नीतो गवाशनैः ॥ ५१ ॥

दमनकु पुसे । करटकु सांघे । कोण्हे एके पर्वतिं पुंसि व्यालि । दोघ पुत्र जाले । ते पारधिये धरूनि नेले । तों वाटे जातां एकु पडला । एकु घरा नेउनि कवतिकें पांजरां घातला । पडला होता तो रुषीश्वरीं देखोनि कृपा उपजालि । आपुलेया आश्रमा नेला । पढिविला । ऐसा एकू वेळ रावो पारधी खेळतां तान्हेला पाराधियांचेया वाटेहुनि येतां पुंसेन देखिला । मग बोलों आदरिलें । म्हणे हा घोडकारि । धरा । मांस हिरौनि आणा । ऐसें पारधियांतें म्हणे । तवं रावो तेथें आला । पुंसेयातें धरिलें । ऐसें आईकौनि रावो तेथुनि निघाला । हिंडतां रुषेश्वराचे आश्रमासि गेला । तंवं पुसेन देखिला । म्हणे रावो आला । याचें यथोक्त अर्चनपूजन करा । हें आईकौनि पुंसियातें म्हणे । तो कोणु आणि तुं कोणु । तंव

ते म्हणति । आम्हि दोघे बंधु । एक रुषीश्वरीं पोसिला । आणि एकु पारधीयें पोसिला । तंव राजा म्हणे । संसर्गजा दोषगुणा भवंति । म्हणौनि दमनका तुझा संसर्गु वोखटा । उक्तंच ।

पंडितोपि वरं शत्रुः नचमूर्खो हितकारकः ।
वानरेण हतो राजा मित्रचौरेण रक्षितः ॥ ५२ ॥

दमनकु पुसे । करटकु सांघे । एके नगारें । राजपुत्रु । वाणियाचा पुत्रु । भटाचा पुतु । ऐसे तिघे हि मित्र सुखें असतां । राजनीति नेणति । जाणौनि रावो पुत्रावारि कोपला । तैसेच येरयेरातें मूर्ख जाणौनि तयांचे पिते तयावरि कोपले । मग तिघे देशांतरें निघाले । हिंडतां हिंडतां वाणिज्य पुत्रें म्हाणितीलें । रोहिताचळ पर्वता जावों । तेंहिं तेथें जावोनु । रत्नें देखिलीं । ते जिवितां पोटि घातालें । तें जेवितां एकें चौरें देखिलें । मग तेणें विचारिलें । ययांसांगातें जावों । हे निजतील इतुकेनि यांचें पोट फाडुं । आणि रत्नें घेवों । ऐसें विचारुनि तयातें म्हणे । मिं तुम्हांसांगातें येईन । मग तेंहि होकां म्हणितिलें । तंव तो हि तयांसमागमें चालिला । तंवं वाटें जातां भिलांचा राजा सर्व भाषा जाणे । तंव एक पाखिरूं बोलिले । जें हे चौघेहि जातााति । इयांपासिं रत्नें आहेति । रायें तयां पाखिरांची भाषा जाणौनि म्हणितिलें । तया चौघांसि धरुनि आणा । पाहिलें । झाडा घेतला । तंव्र कांहीं नाहीं । मग ते सोडिले । पुडति पाखिरुं बोलिलें । जें यांपासि रत्नें आहेति । रायें मागुतां झाडा घेतला । तंव नाहींत । तंव पाखिरुं तिसरेनं बोलिलें । यांपासिं रत्नें आहेति । मागाति शोध घेतला । तंव्र रत्नें नाहित । मग रायें मनिं विचारिलें । जे यांचे पोटामधें रत्नें असतिल । तरि यांचिं पोटें फांडावि । [ येथून शेवटपर्यंत मजकूर तृटित आहे. ]

# पंचतंत्र.

## द्वितीय तंत्र-मित्रसंप्राप्ति नामें.

आतां दुसरें तंत्र मित्रसंप्राप्ति सांघेन । उक्तं च ।

असाधना वित्तहीना बुद्धिमंतो बहुश्रुताः ।
साधयंत्याशु कार्याणि काककूर्ममृगाखुवत् ॥ १ ॥

दक्षिणदेशिं प्रमदारोप्य नाम नगर । तयाबाहिर वटवृक्ष थोरु असे । तेथें बहुत पक्षी असति । लघुपतनकु नामें काउळा तेथें वसे । प्रातःकाळीं तो चारा घेवया निघाला । तंव पारधि जाळें घेउनि । तया वडरुखाखालिं येतुजातु देखिला । लघुपतनकें विचारिलें । मागुतें वडावरि उडौनि येउनि बैसला । तंव पारधियें येउनि वडाखालिं जाळें पसरिलें । आणि तया जाळियावरि कण विखुरले । पारधि दुरिं बैसला । तें देखौनि लघुपतनकें । अवघियां पक्षियातें वारिलें । म्हणितिलें । तुम्हि हे कण खावों नका । आणि रुखाखालिं नुतरावें । येथें पाश घातले असति । तें ऐकौनि कोण्हि चारा घ्यावया नुतरेचि । तंव तो चित्रग्रीव नामें होळियांचा राजा । अपारां होलियां सहित । गगनमार्गें जातु होता । तंव तया जाळियावरि कण देखौनि । खावयासि उतरला । तयातें लघुपतनकें वारिलें । परि तो वारिलें न करि च । तयानें जाळियावरि बैसौनु कण खादले । ते अवघे फांसिं पडियले । इतुकेनि तो पारधि होलेयासि धरावया धाविंनला । तयातें देखौनि तो चित्रग्रीउ आपुल्या परिवारातें म्हणे । अवघे सांगातें एकाचि वेळा उडों । असंगत डोआल तरि मराल । म्हणौनि श्लोकु पढे ।

एकोदरपृथग्ग्रीवा नानादेशविहारिणः ।
असंहता विनश्यंति भरंडा इव पक्षिणः ॥ २ ॥

पक्षि पुसति । चित्रग्रीउ सांघे । भेरुंडा नामें पाक्षि एकु । तयासि पोट एक । आणि मुखें दोनि । तो हिंडतु हिंडतु । एकें मुखें अमृत देखिलें । तें दुसरेया मुखातें म्हणे । आधिं मज हें अमृत खावों दे । म्हणौनि मागों लागला । तंव तें नेदिच । मग तया मुखें रागेंकडुनि । विख खादलें ।

तंव तो पक्षी मेला । म्हणौनि तुम्हि अवघे एकवाट होआवें । ऐसें चित्रग्रीवें तयासि सांघितलें । मग ऐसें ऐकौनि । तें जाळें घेवौनि गगनमार्गें एकसरेंचि उडौनि गेले । तंव तो पारधि विस्मो करि । म्हणे । जेधवां हे वादु करितिल । तेधवां अवघे पडतिल । आणि मग मि तयातें मारीन । म्हणौनि वरुतें दृष्टीतें जाळें पाहातु निघाला । तयातें चित्रग्रीउ वडाण घेउनि डोंगरा एका पैलाडि गेला । इतुकेनि तो पारधि निरास होउनियां म्हणे । ऐसें कधिं जालें नाहीं । होले गेले ते गेले । पारि माझें कुटुंब पोसितें जाळें हि नेलें । ऐसें म्हणौनि । आपुलिया घरासि गेला । तंव तो पारधि गेला ऐसें जाणौनु । चित्रग्रीउ म्हणे । आपण प्रमदारोप्य नाम नगर । तेथें गावांबाहिर एकु मठ असे । तेथें हिरण्यु नामें उंदिरु । तो आपुला मित्र असे । तयापासिं जावों । तो आमुचे पाश तोडिल । म्हणौनि तेथें गेला । तया उंदिराचें शतबिळ दुर्ग । ते वाढियेपासिं जाळेयासहित उतरले । हिरण्या हिरण्या म्हणौनि बोलाविला । तंव तो चित्रग्रीउशब्द वोळखौनि बाहिर आला । तंव ऐसें कां जालें । तंव चित्रग्रीउ म्हणे । देखतोसि आणि काये पुससि । म्हणौनि श्लोकु पढे ।

> सपादयोजनशतादामिषं पश्यति खगः ।
> सोपि पार्श्वे स्थितं दैवाद्बंधनं न च पश्यति ॥ ३ ॥

हें आईकौनि तेणें चित्रग्रीवाचे पाश छेदुं आरंभिले । तंव तो म्हणे । आधिं यां अवघेयांचे पाश छेदि । मग माझे छेदि । हें ऐकौनि । हिरण्यु म्हणे । मियां तुझेया गोसांविपणाचि परीक्षा पाहिली । तन्हि तुजपरता आणिकु सेव्यु नाहिं । म्हणौनियां आधिं अवघेयांचे पाश छेदिले । मग तयाचे छेदिले । आणि म्हणे आतां तुं सुखें । आपुलिया गांवांसि जाये । म्हणौनि पाठविला । तंव तो चित्रग्रीउ आपुलिया ठायासि गेला । हें अवघें लघुपतनक काउळियानें देखिलें । मग तो मनिं विचारि । म्हणे । आम्हि धूर्त हो । पारि पक्षियें । हा हिरण्यु मित्र जालिया । अवघिं बंधनें व्यसनें निस्तरिजति । म्हणौनि तो हिरण्याचे बोहियेपासिं जाउनि । हिरण्या हिरण्या म्हणौनि बोळविला । तंव तो हिरण्यु मनिं विचारि । म्हणे । चित्रग्रीउ गेला । आतां हा कर्कश सादु करुनि । कोणु माझें नांव

घेउनि । बोभातु असे । ऐसें म्हणौनि । ते वोहियेआंतुन पुसे । म्हणे तुं कोणु । तंव तो म्हणे । मि लघुपतनक नामें काउळा । तुजासि मैत्रि करूं आलों असे । तंव येरु म्हणे । तुं येथुनि जाये । आम्हां तुम्हांसि सहज वैर । काउळे उंदिरातें खाति । तरि तुज येथें असणें निकें नोहे । तुवां वेगिं येथुनि जाईजे । तंव तो वायसु म्हणे । तुवां चित्रग्रीवाचि बंधनें छेदिलें । तें मियां अवघें दृष्टी देखिलें । तरि मिहि पक्षि असे । मजहि व्यसन-प्राप्ति जालियां । तुझेनि मित्रत्वपणें । अवघिं व्यसनें । निस्तरि-जेतिल । म्हणौनियां तुजसीं मैत्री करणें । ऐसें विचारुनि हिरण्यातें म्हणे । तुं मजसि मैत्री करिसि । आणि तुं मजसि भेटासि । तंव परियंतु आपणु आपणु येथुनि न व जायेचि । प्राण जाति तंवं परियंतु मि येथेंचि राहिन । ऐसें ऐकौनि । तो हिरण्यु मनि विचारि । म्हणे हा दुष्टबुद्धि नोहे । येणेंसिं मैत्री करुं । म्हणौनि वायसातें तेणें । प्रत्ययालागिं । मि तुजसि निष्ठुर बोलिलों । तरि आतां तुजासि आणि मजासि मित्रत्व । आतां तुं जाणसि ते करि । म्हणौनि बाहिरि निघाला । जवळिके बैसला । नावेक होता । इतुकेन काउळा उडौनि राणासि गेला । आणि उंदिरु वोहे आंतु रिघाला । तंव काउळियानें मेळियाचें मांस आणिलें । तें उंदिरासि दिधलें । आणि उंदिरेंहि काउळियासि तांदुळ दिधलें । ऐसें परस्परें मित्रत्व जालें । प्रीतिचे लक्षण ऐसें जेविलें आणि बैसले । ऐसे दोघे सुखें असतां । बहुत दिवस गेले । तंव एके दिवसिं तो काउळा उंदिरातें म्हणे । आतां ये देशीं अवर्षण पडलें । बळिदान देणें नाहिं । आणि प्रतिघारिं पाश केले असति । पाशिं पडिलिया मारिजैल । म्हणौनि आतां मि येथुनि जाउनि जेथें माझा मित्र मंथरकु कासउ असे । ते सरोवारिं मज सान सान मासे आणि जळिंचे जीव आणौनि देईल । तो मिं आहारु करिन । तंव हें ऐकौनि तो हिरण्यु म्हणे । मिहि तेथें येईन तंव तो म्हणे तु का येसिल । येरु म्हणे सांघणें अपार असे । तंव तो काउळा म्हणे सांवैं । तंव तो म्हणे तेथोंचि गेलियावरि सांगैन । तंव तो काउळा म्हणे तुं स्थळचरु । कैसेनि येसि । तंव येरु म्हणे । तुं हळुहळु आपुलेया पाठिवरि घालुनि नेई । आणि मि पवना-भ्यासु हि जाणतु असें । तितुका हि भारु तुजवरि पडों नेदि । मग

काउळा हरिखेला । होकां म्हणितिलें । आणि तया सरोवरासि गेले । तंव मंथरकातें काउळेयानें आपुलें नांव सांगौनु बोलाविला । तंवं तो हारि खेजतु आला । मग एकमेकातें क्षेमालिंगनें जालिं । तेणें सकळ हि वृत्त पुसिलें । तंव एणें क्षेमारोग्य सांवितलें । मग तिघे जण । तया सरोवराचेया थडियेसि रुख असे । तयाचेया छायेसि बैसले । तंव तया मंथरकें । काउळियातें पुसिलें । म्हणे हा कवणु । तंवं लघुपतनकु म्हणे । हा हिरण्यु माझा मित्रु । अववेयांचिया गुणांसि गणना असे । परि याचेया गुणांसि गणना नाहिं । परि हा थोरल्या दुःखातें पावला असे । मियां यातें पुसिलें । मज बोलला तेथेंचि जाउनि सांघों । मग तया उंदिरातें म्हणितलें । या उपरि तु सांवें । तंव तो उंदिरु सांघे । आणि ते दोघे आईकेति । म्हणे महिळारोप्य नाम नगरि । तये नगरिं गांवाबाहिर । देउळाचे पाळिस एकु मत्स्य असे । ते मठिं बटुकर्णु नामें संन्यासी वसे । तो गांवांआंतु जाउनि भिक मागे । नानाविध पक्कान्नें आणि । जेवी आणि उरलें अन्न उंदिराचे भेणें सिंका ठेवि । तें उच्च स्थानिंहि असौनि । मिं उडौनि सिंकेयाचें अन्न खातु असें । ऐणें रीती सुखें असें । तंवं एकें दिवसिं बृहास्फिक नामें तपस्वी । बटुकर्णापासीं आला । दोघे जेविले आणि रात्रीं निजेले । मग तया बृहस्फिकें तीर्थयात्रा आणि पुण्यस्थानें देखिलीं । तेथिल महिमा गोष्टी सांघे । तंव तिया गोष्टी बटुकर्णु दुश्चितपणें नाईके । मग तो तपस्वी रागें ठेला । आणि तो बृहस्फिकु बोले । म्हणे मियां तुझा आदरु जाणितिला । तरि मि प्रभातेसि । आणिके मठासि जाईन । अरे मठाधिपत्यें गर्वें नदेखसि ऐणेंकरि तुं नरकासि जासि । तंव तो बटुकर्णु भयभीत जाला । म्हणे मित्रा कोपों नको । म्हणे जेणेकारणें मिं दुश्चितु तें आईकें । म्हणे ऐथें एकु उंदिरु असे । तो हें उरलें अन्न सिंकां ठेविलें असे । तें उडौनि नीच खाये । तया कारणें मिं फोडिले वेळुवाचे कांठिनें तयातें वारितु असे । परि तो न वारेचि । याकारणें मिं दुश्चिल असें । तंव तो बृहस्फिक म्हणे । याचें धन तुं नेणसि । हा धनाचेनि बळें उडतु असे । तेयाचें धन काढौनि घेवों मग याचा उबारा जाईल. । इतुकेनि तयासि उडवेना । हें ऐकौनि मिं तेथौनि अववेयां उंदिरांसहितु पळालों । तंव पळतां वाटेसि । एकें रानमांजरें अवघे उंदिर मारिले । कितेक खादले

आणिक कितेक पळाले । तंव मिंहि पळालो । तंव तेंहि दोघिं माझेया चोहियां खाणितिल्या धनाचा तांबिया भरला होता । तो काढौनि नेला तेणें ते सुखि जाले । तंव मिं मागुता तें अन्न खावयासि गेलो । परी मज उडवेचिना । उडौनु बैसलों । तंव मागुता पडलों । हें देखोनियां ते तपस्वी हांसले । म्हणति एथें जें कारण होतें तें आम्हि काढिलें । उक्तं च ।

> नाकस्माच्छांडिलीमाता विक्रीणाति तिलै स्तिलान् ।
> लंचितानितरैर्येन हेतुस्तत्र भविष्यति ॥ ४ ॥

बटुकर्णु पुसे । बृहस्फिक सांघे । म्हणे मि हिंडता । एका ब्राह्मणाचे घरिं वांसिनलों होतों । तेथें प्रातःकाळिं तया ब्राह्मणें आपुलेया ब्राम्हणीतें म्हणितिलें । तें मियां आईकिलें । तें तु आईकैं । म्हणे दक्षिणायन कर्कसंक्रांति पुण्यकाळ । मि तीर्थाप्राति जाईन । तुं यथाशक्ति एका ब्राह्मणासि भोजन दे । तंव ते ब्राह्मणी म्हणे । तुं बोलतां लाजेसिना । दुर्वाडिया । भिकारिया । तुझेया घरिं कैचें ब्राह्मणभोजन । तुझें हातिं जया दिवसापासुनि लाविलियें । ताधिपासुनि कोण्हे विशिचें सुख नदेखेंचि । अन्न न मिळे । मग लेणें लुगडिं कैंचिं । तंव तो ब्राह्मणु भीतभीत म्हणे ।

> अति तृष्णा न कर्तव्या तृष्णां तव परित्यजेत् ।
> अतितृष्णाभिभूतस्य चक्रं भ्रमति मस्तके ॥ ५ ॥

ब्राम्हणी पुसे । ब्राम्हणु सांघे । म्हणे एके अरण्यांतु । पाराधिये सोरु विंधिला । म्हणौनि तिये नगारि प्राप्तव्यमर्थु असें तयाचें नाम जालें । तंव ते नगरिच्यां रायाची कन्या । [येथून शेवटपर्यंत मजकूर त्रुटित आहे.]

---

# पचतंत्र.

## तृतीयतंत्र काकोलूकीय.

आतां तीसरें तंत्र । राजपुत्र पुसति । आणी विष्णुशर्मा सांघे। उक्तं च ।

न विश्वसेत्पूर्वविरोधितस्य । शत्रोश्च भित्रत्वमुपागतस्य ॥
दग्धां गुहां पश्य उलूकपूर्णां । काकप्रणीतेन हुताशनेन ॥ १ ॥

दक्षिणदेसीं पैठण नाम नगर । तेथें नगराबाहेर थोर वडाचा वृक्ष असे । तेये वृक्षीं मेघवर्ण नाम काउलीयांचा राजा । अपार काउलीयांसी वसे । आणी येके डोंगरीं अरिमर्दन नामें उलुकांचा राजा । थोरलें विवर तेथें । अपारां उलुकासि वसे । ता रात्रि येउन काउलीयांतें मारी । येके दीवसीं बहुत काउले मारीले । उरले काउलीयांसी आणि आपुलीये मंत्रीयांसि मेघवर्ण विचारी । त्यास मंत्री ६ । येका नाम उज्जीवी । येका नाम संजीवी । येका नाम प्रज्जीवी । येका नाम अनुजीवी । येका नाम । चिरंजीवी । येका नाम स्थिर जीवी । यैसे सा प्रधाय राजा तयात म्हणे आमुचा वैरी । बलीकटु । आमतें रात्रीं येऊन मारी । आम्ही तरि रात्रं नेदखों। आणी दिवसा त्यांचें स्थान नेदखों । तरी । संधी । विग्रहा याना आसन आश्रयो । द्वैधाभाव । या सां आत कोणें प्रकारें । वैरी साधे । ते सांगा । नरी ते मं म्हणती बोलीलीया सांघावें । उक्त च ।

अपृष्टेनात्र वक्तव्यं संबंधेनापि केनचित् ।
पृष्टे विशेषतो वाच्यं वक्तव्यांशं महीपतेः ॥ २ ॥

मेघवर्ण उज्जीवीयातें पुसे । यैसीयातें काये मीत्रु कीजे । तंव तो म्हणे हा वैरी । बलीकटु । येणेंसी संधी करावी । बोलिलें असें ।

बलीयसि प्रणमतां काले प्रहरतामपि ।
संपदो नापगच्छन्ति प्रताप इव निम्नगाः ॥ ३ ॥

अनेकें प्रकारें सांधी केलीया बरवें होये । हें आईकौनि राजा । संजीवियातें पुसे । तवं तो म्हणे माझिया मनासि संधी न ये । जुझौनु प्रतापें राज्य करावें ! बोलिलें असे ।

मृत्योरिवोग्रदंडस्य राज्ञो यांति द्विषो वशम् ।
सर्वे ते हंतुमिच्छन्ति दयालुमिति मे श्रुतम् ॥ ४ ॥
मायया शत्रवो साध्या अवध्या सुबलेन ये ।
यथा स्त्रीरूपमासाद्य हतो भीमेन कीचकः ॥ ५ ॥

हें आईकौनु प्रजीवीयातें पुसे । तंव तो म्हणे । माझीया मनासि संधिविग्रहो नये । प्रस्तुत गोसावीयांसी यान माझीया प्रत्ययासी येतें । यानें दो प्रकारींचीं । जे बळीकटु नव्हे तिया परीस कटकै चांग । बळी-कटु आपणीयाहुन जाणौन परी तया सरीजे । उक्तं च ।

बलवंतं रिपुं दृष्ट्वा देशत्यागं करोति यः ।
युधिष्ठिरमिवाप्नोति पुनर्जीवन्स मेदिनीम् ॥ ६ ॥

म्हणौनि संधिविग्रहो माझ्या मनासि नैये । जें रिपु बळीकटु म्हणोन पळणें नीके । हें ऐकोन प्रजीवीयातें पुसे । तंव तो म्हणे विग्रहो माझ्या विचारासि । नैये तिन्ही नैयेति । गोसांवीं दुर्ग न संडावे । जयासि दुर्गाचें बळ तो कोण्हाही न जींकव । म्हणौन दुर्ग असे तरि सहाय ही होय । दुर्ग नाहीं त्याचें सहाय नव्हे । उक्तं च ।

वनानि दहते वन्हिः सखा भवति मारुतः ।
स एव दीपनाशाय कृशे कस्य न सौहृदम् ॥ ७ ॥

म्हणौनु दुर्गी संश्रयो बरवा । मग अनुजीवियातें पुसे । तो म्हणे आसन चांग । यैसा चौघांचा विचारु । आईकौनि मग चिरंजीवीच्या । बापा-लागुन । तो मंत्री वृद्ध अवघें न्यायशास्त्र जाणे । त्याच्या पाया पडौनु मेघवर्णु पुसे । म्हणे तुवां यिहिं बोलीलें तें अवघें आईकिलें । आतां मियां काये करावें तें तुं सांघें । तंव तो म्हणे इहीं बोलिलें तें नीतिशास्त्र होय । युक्त होये । परी हा द्वैधीभावाचा कालु । म्हणौनि द्वैधीभावो करावा । आपण तरी विश्वासु न करावा । आणी पुढिलीयांसि विश्वासउनि वैरी मारावा । वैरी विश्वासलीया तयाचें वर्म जाणीजे । आणि तयातें मारीजे । तंव मेघवर्णु पुसे । वर्म कैसेनि जाणिजे । तवं चिरंजीवी म्हणे । वीरें हें जाणिजे । आणी तेत्तीस तीर्थें राजेन जाणावीं । मंत्री १ । पुरोहित २ । सेनापती ३ । युवराजा ४ । दारकारु ५ । अंतोरिकु ६ । प्रशास्ता ७ ।

समाहर्ता ८ । सन्निधाता ९ । प्रदेष्टा १० । केसविचुरा ११ । हस्तिसाहाणी १२ । लेंकुरवें राखता १३ । घोडेसाहाणी १४ । पारीषद १५ । दुर्गपाळ १६ । उत्कट पांडव १७ । पुढीला वैरीयासि भेद करि जो १८ । माता १९ । राणी २० । खोसरा २१ । मालाकार २२ । सेजारी २३ । स्पर्शाध्यक्ष २४ । जोइसी २५ । वैद्य २६ । कन्हेरी २७ । हडवी २८ । आचार्या २९ । आंगवळका ३० । अधिकारिया ३१ । यंत्रधर ३२ । विलासिनी ३३ । या इतुकियांचेनि आंगे आपुणीया नाशु । म्हणौनु हे ही राजेयांनीं जाणावीं । तवं मेघवर्ण तयातें पुसे । म्हणे आम्हासी डुडुळुकासि जीवपर्यंत वैर । होत्रायासि कारण काये । मग तो चिरंजीवी सांग्ने म्हणे पूर्वी अववे नाना जातिचे पक्षी मिळौनि विचारिलें । म्हणती आपुण एखादा ज्ञातारु ऐसा राजा करुं । यैसें विचारुनी । डुडुल डोळे थोरले यैसा देखौनी । राजा करुं आदरिला । राज्याभिषेका पूजासमारंभ मेळउनी । सिंहासनि बैसउनि अभिषेकु करावा । तवं तेथें काउला आला । तयातें देखौनि ते अववे म्हणति । उक्तं च ।

नराणां नापिको धूर्तः स्त्रीणां धूर्ता च मालिनी ।
चतुष्पदां शृगालश्च श्वेतभिक्षुस्तपस्विनाम् ॥ ८ ॥

तरि हा काउला आला नव्हता । आतां हा आला । मग तेहिं काउळियातें पुसिलें । म्हणति आम्हि हा राजा करूं किं नको । तंव तो म्हणे हंसमयूरादिक पक्षी निके । शुकसारिका नानाविध यैसे पक्षि असतां । डुडुळासि कोणें राज्य दिधलें । उक्तं च ।

वक्रनासं सुजिव्हाक्षं क्रूरं चाऽप्रियदर्शनम् ।
अक्रुद्धस्य दृश्यवक्त्रं च तस्य क्रुद्धस्य कीदृशम् ॥ ९ ॥

म्हणौनि हा राजा आमुच्या प्रत्ययासि नैये । आणि येकु गरुड राजा असतां । आणिकु दुसरा राजा करणें । तेथें नाशु पाविजे । समर्थांचेनि नामेंचि अवघडें निस्तरीजाति । उक्त च ।

व्यपदेशेन महतां सिद्धिः संप्राप्यते परा ।
शशिनो व्यपदेशेन वसन्ति शशकाः सुखम् ॥ १० ॥

पक्षी पुसति । काउळा सांघे । कोण्हे येके वनिं चतुर्दंत नामें हस्तिचा राजा । तेथें अवर्षण पडिलें । तेणेंकरुनु तेथील पाणि आटलें । मग ते हस्ती पाणियेंविण मरों लागले । इतुकेन बहुत उदक चंद्रसरोवारीं आईकौनि । त्या चंद्रसरोवरासि पाणि प्यावया हस्तियुथ गेलें । त्या सरोवराजवळि । ससियांचि कोहकें अपारें असतिं । तेथें ससे बहुत । असति । तया वाटा हस्तियुथा येतां जातां । ससे त्यांचे पाइं रगडौनु मेले । मग उरले ससे विचारिती । म्हणति मागुतौ हस्ति आलिया आपणहि मरोन । मग विजयोनाम ससा । तो बहुतु बुद्धिवंतु । तो म्हणे मिं आपुलिया बुद्धि हस्ति इकडे न येति यैसें करीन । यैसें यैकौनि शिळामुख ससेयांचा राजा । त्या विजयातें मानि । मग तो विजयु ससा । तया हस्तिपासिं जाउनि । उंच शिळेवरि बैसौनु । त्या गजेंद्रातें म्हणे । तुज अवघे भलें । तें वचन आईकौनि । अवघे हास्ति म्हणति तुं कोण सांग । मग तो ससा म्हणे भि चंद्राचा दूत । तवं ते म्हणति तुं कां येथें आलासि । काये म्हणतोसि ते सांग । मग तो विजयु नामें ससा म्हणे । दूत पुढिलांचे निरोपें बोलति । तरि आईका । चंद्र तुजवरि कोपला । जें माझें ससें या सरोवराते राखावया ठेविलें होतें । तुं त्याचे म्हणितिलें न करिस । या सरोवरासि मागुता येसिल । तरि मग तुं जाणासि । या कारणें मातें । तुजपासि पाठविलें असे । आणि या सरोवरासि येता । आमुचा नासु होतुसे । म्हणौनि तुवां आजी लागुन या सरोवरासि न यावें । आलासि तरि तुजवरी चंद्रमा कौपेल । आणि मग तुज वीरु करील । यैसें ऐकौनि तो हस्ती म्हणे मज बोलु लागला । तरी मातें चंद्रातें तुं दाखवी । मिं तयाच्या पायां पडौनि विनवीन । मग तो ससा म्हणे तुं येकलाचि ये । तुंतें चंद्रातें भेटवीन । मग तो हस्तींचा राजा तया सासियापाठीं आला । मग त्या ससेयानें चंद्राचें बिंबप्रातिबिंब सरोवरांत उदकामध्यें दाखाविलें । तें देखौनि हस्ती पायां पडे । म्हणे जी मी आजिलागुन या सरोवरासि न ये । यैसें म्हणउन मागुतें त्या सरोवरासि हस्ती न येतिच । मग तें ससे सुखें असो लागले । म्हणौनि समर्थाचेन नामें दर्पेंच कार्य होये ।आणि हा डुडुलुक अप्रयोजकु । याचेनि हातें कोण महत्कृत्य होईल ।म्हणौनि हा माझे प्रत्ययासि नये । हा क्षुद्र वोखटा । उक्तं च ।

क्षुद्रमर्थपतिं प्राप्य कुतो विवदतां सुखम् ।
उभावपि क्षयं प्राप्तौ मार्जाराच्छशतित्तिरौ ॥ ११ ॥

पक्षि पुसति । काउळा सांगे । म्हणे मिं येके वृक्षिं असे । त्या वृक्षाचां ढोलिं येकु तितरु होतरु होता । आम्हि दोघे विळचा तये वृक्षिं मिळों । बरवीया कथा गोष्टी करुं । यैसे बहुत दिवस क्रमले । तंव देशांत शाळी पिकल्या ऐकौनि त्या साळिखावयासि तो तितरु गेला। बहुत दिवस जाहाले । परि तो न ये चि । तेणें मज थोर असुख जाहालें । मग त्या तितिराचिया ढोलासि । सीघ्रगु नामें ससा आला। तो तेथें रिघाला । परि मिं तयातें न वारिंच । तितरु न ये चि । म्हणउन । तंव तो तितरु साळि खाउन मोटा होउनि आपुल्या ठायासि आला । तो तंव आपुले कोठारिं रीघे तंव तेथें ससा बैसला असे । तयातें देखौनि तितुरु रागे ठेला । म्हणे माझेया घराबाहेरि तुं निघ । तंव तो ससा म्हणे । मुर्खा तुं काये बोलतोसि । घर शून्य देखिलें तरि मग मि राहिलों । तरि जो जेथें वसे । तें त्याचोंचि घर असे । तंव तितुरु म्हणे जावों न्याव करुं । तंव तो म्हणे जाणतियापासिं जावों । ते माझा तुझा झगडा तोडितिल । ते ज्यासि हें घर देतिल । तो तेथें राहील । हो कां म्हणौनि ससा म्हणे । कोणापासि जावें । तंव तितरु म्हणे गंगेचे थडियेसि दधिकर्णु नामें मांजरु असे । तो चांग जाणता । तयापासिं च जावों । ते दोघे हि तेथें गेले । त्यांतें देखौनि तो ससा भयाभीत जाहाला । म्हणे हा क्रूर वोखटा हा नको । यैसें बोलणें तया मांजरें आईकौनि । तयातें विश्वासौनियां दों चि पायावरि उभा ठाकौनि । हात वरते उचलुनि । आणि डोळे हि निमटुनि । तप करुं आदरिलें । मग ते दोघे विश्वासले । तेंहिं तयासें वृत्त सांगितलें । तंव तो म्हणे मिं वृद्ध कानिं नाइकें । ते तरि दुरुनि पुसति । तंव मांजरुं म्हणे न्यावो अन्यावो तयातें तुं खाय । तंव तो म्हणे यैसें नेबलावें । म्यां अवघें सांडिलें असे । संसार लटिका आणि पापरूप । यैसें ऐकौनि ते विश्वासले । जवळि आले । इतुकेन येकातें तेन तोंडिं घातलें । आणि दुसरा हातिं धरुनिं नखिं विदारुनि मारिला । म्हणौनियां क्षुद्र राजा वोखटा । यैसें कावळियाचें बोळणें आईकौनि । अवधियांचा प्रत्ययासि आलें । काउळा निकें बोलिला । म्हणौनि अवघे उडौन गेले । येकला डुडुल आणि

डुडुलि । राहिली । तंव तो डुडुल म्हणे । अभिशेषु अज्ञुणु कां न करिति च । तंव तो डुडुल म्हणे काउळें विघ्न केलें । तंव तो म्हणे तेणें मजसि अकारण वैर केलें । म्हणौनि आम्हां आणि काउळियां अत्यंत वैर । यैसें म्हणौनि उलुकें हिं वांसौनि आपुलियां घरासि गेलीं । मग तो काउळा मनिं विचारि । म्हणे म्यां बोलौनि वैर केलें । मग तो काउळा हि आपुलिया घरासि गेला । तैंलागु आम्हां आणि डुडुळां थोर वैर । मग तो मेघवर्णु राजा म्हणे ताता । ऐसियासि आम्हीं काये करणें आतां तें तुं सांग । तंवं तो चिरंजीवी म्हणे उपाया वेगळा । येक उपाय असे । तो मिं करित । तेणें करुनि वैरी अवघे मारिन । उक्तं च ।

बहुबुद्धिसमायुक्ता घनविज्ञान—सूत्कटाः ।
शक्ता वंचयितुं धूर्ता छगलाद्ब्राह्मणं यथा ॥ १२ ॥

मेघवर्णु पुसे । चिरंजीवी सांगे । कोण्हे येके ठांईं मित्रशर्मा नामें ब्राह्मणु अग्निहोत्रि । तो आणिका गांवांसि जाउनु करावया यजमानातें । थोरला बोकुड मागोनि खांदियावरि घालुनिं । मागुता आपुल्या स्थानासि येता जाला । तयासि वाटेसि येतां धूर्तें देखिला । तेंहिं विचारिलें । म्हणे या ब्राह्मणातें सितरुं । आणि हा बोकुड घेवों । इतुकेंनि आमुचिया प्राणासि तृप्ती होईल । यैसें विचारुनि तिघां धूर्तां आंतुनु । येकु पुढां जाउनि त्या ब्राह्मणातें म्हणें । अहो तुम्ही निके श्रोत्रि । आणि खांदियावरि वाउनि मेलें सुणें कां नेत असा । तंव तो ब्राह्मणु रागें टेला । म्हणे आंधळेया डोळां नेदखेसि । बोकुडासि कैसें सुणें म्हणतोसि । तंव येरु म्हणे कोपों नको । देखिलें तें म्हणतों । पुडति वाटे जातां । दुसरा धूर्त म्हणे । भटोजि मेलें वांसरु कां खांदियावरि वाहौनि नेत असा । तंव त्या भटासि रागु आला । म्हणे मूर्खा देखसि नां । बोकुडासि मृत वत्स म्हणतोसि । तंव तो म्हणे देखिलें तें बोलिलों । कोपासि कां । तंव पुढें वाटे जातां । तिसरा धूर्त बोलिला । तंव तो म्हणे गोसांविं मेलें गाढव खांदियावर घालुनि कां नेत असा । यैसें तिघां धूर्तांचें बोलणें तिं प्रकारिचें आईकौनि । तो ब्राह्मणु म्हणे खांदियावरील बोकुड काय राक्षस असे । नाना परिंचि रूपें धरिजो । म्हणौनि बहुत बुद्धि जो जाणे । त्याचेति भलतें कार्य होये । तंव

चिरंजीवी म्हणे दुर्बल बहुत । परि बलिकटु येकटा चांग । तऱ्हि विरोध न करावा । उक्तंच ।

बहुना च विरोधेनाऽदुर्जयो हि महाजनः ।
स्फुरंतमपि नागेंद्र भक्षयंति पिपीलिकाः ॥ १३ ॥

मेघवर्णु पुसे । चिरंजीवी सांगे । कोण्हे येके वावराळें । थोरला अतिदर्प नामें सर्प असे । तो साने द्वार निवतां त्याचें सर्वांग सोलर्ले । तेथें मुंगिया लागलिया । तंव तेहिं सर्वांगिं क्षतें पाडिलीं । तहिं खति तो सर्प सुजोन मेला । म्हणौनि बहुतेसि विरोध न करावा । तंव तो चिरंजीवी सांगे । म्हणे मीं जे म्हणैन सांगैन तें तुवां कोण्हासि नेणता करावें । मिं आणि तुं चि जाणें । अवावियां देखतां वेवादु न करावा । म्हणे माझे पांख उपडावे । आणि माझें शरिर रक्तें माखुन मज रुखां-खाले घालावें । इतुकेनी ते मज विश्वासति । इतुकेनि मिं तयातें मारिन । जें त्यांचिया दुर्गासि येकचि द्वार । आणिक रिघावा नाहि । हें करितां माझि कणव तुम्हीं न करावि । म्यां सांगितलें तें तुम्हीं करावें । आणि तुम्हीं अवघे ऋषिमुख पर्वतासि जावें । जंववरि मिं वेरियातें मारिन । मग मी सांगेन ते वेळेसि यावें । मग तिहिं तैसेंचि केलें । तंव रात्रि डुडुळ आले । सहपरिवारें वृक्षावरि पसरले । तंव तेथें काउळा येकुहि नाहि । सभोंवतें पाहो लागले । तंव कांहि नेदखति । मग चिरंजीवीन आपले मनिं विचारिलें । म्हणे आतां आपणीयातें दाखउं । हे गेलियावरी माझि बुद्धि काये कार्यासि येईल । म्हणौनि हलुहलु बोभाईला । तंव अरिमर्दनु डुडुळ राजा तयातें पुसे । म्हणे तुं यैसा कां चिरंजीवी । तंव तो म्हणे । मीं मेघवर्णातें म्हणत होतों । जें तुं अरिमर्दनु उलुकराजियासि मिळोनि वर्त । यैसें म्यां सिकविलें । तंवं तो म्हणे हा वैरि । यातें वानीतो । म्हणौनि माझें पांख उपडिले । आणि मज चुंचिवरी टों-चिलें । आतां मिं तुज शरण आलों । या उपरि तुं जाणति तें करि । आणि बळिकटु होयें । तंव मज आपुलिया ठायासि ने । मिं बळिकटु जालियां । अवघे काउळियांतें मेराति यैसें करीन । यैसें त्याचें बोलणें आईकौनि । आपुले मंत्रि । रक्ताक्षु । क्रूराक्षु । दीप्ताक्षु । वक्रनासु । प्रकारकर्णु । यैसै पांच मंत्रि । तंव राजा रक्ताक्षातें पुसे ।

म्हणे हा यैसा बोलतु असे । तरि काई करणें तें सांग । तंवं तो म्हणे । येथें काइसा विचारु । हा मारावा । उक्तं च ।

फणि: पश्यति दंडं वा सुतं पश्यति ब्राह्मणः ।
उभयोर्बद्धवैराणां मित्रत्वे किं प्रयोजनम् ॥ १४ ॥

अरिमर्दनु पुसे । रक्ताक्षु सांगे । कोण्हे येक ठाई । ब्राह्मणु वाहावळु । तयाचें सेत कधिं हिं न पिके । येके दिवसि शिणला । तो सेतिचे रुंखातळि तान्हेला । तैसाचि निजेला । तव तेथें वावरुळावरि पर्वत ऐसा सांपु फडे केलि यैसा देखिला । तंव ता ब्राह्मणु मनि विचारी । म्हणे हा क्षेत्रस्वामि आतां यातें पुजीन । म्हणौनि प्रतिवर्षि सेत न पिके । आतां मि यातें पुजीन । म्हणौनि एक वेळणी दुध घालुनि । त्या सापापुढें । दुधाचि वेळणी ठेउनि । आपण घरासि आला । प्रभाते तो ब्राह्मणु तेथें आला । तंव तिये वेळणीमध्यें दिनारि सोनटका देखिला । तेणें तो हर्खेला यैसा तो नित्य दुध घालि । आणि नित्य सोनटका घेउन ये । तंव एकें दिवसिं तो ब्राह्मणु गांवासि गेला । आणि आपुल्या पुत्रासि दुधाचा निरोपु सांगीतला । त्या पुत्रें तैसेंचि केलें । प्रभातें सोनटका देखौनिं मनिं विचारी । म्हणे ये वावरुळि अपार सोनटके असतिल । म्हणौनि येरे दिवसिं प्रभाते दुध घेउन आला । सांप देखौनि लांकुडें हाणीतलें । फडेसि घावो लागला । परि न मरेचि । तेणें घायें सापु कोपु कोपला । परतौनि तयातें डंखिलें । तो मेला । तेथेंचि सेताजवळि जाळिला । तंव तो ब्राह्मणु आला । लोकांपासुन अवघें वृत्त आईकलें । उक्तंच ।

भूतान्येवानुगृण्हंति घ्नंति शरणागतम् ।
भूतार्थास्तस्य नश्यंति हंसाः पद्मवने यथा ॥ १५ ॥

लोक पुसति । ब्राम्हणु सांगे । कोण्हे येके नगरिं । चित्ररथ नामें राजा । तयाचें पद्मसरोवर । तेथें सोनियांचे हंस । ते मासा प्रत्येकें पिसें सोनियांचीं दोनि दोनि तया रायातें देति । तंव तेथें सोनियाचा पक्षी थो आला । तया पक्षियातें हांसिं म्हणितलें । आम्ही रायासि सां मासां पिसेंर दोनि दोनि देतु असों । म्हणौनि तुं येथुन वेगां जाये । तंव तो पक्षि रागे ठेला । रायापासिं यैसे जाउनि म्हणितिलें । जें हंससरोवरिचे पक्षि

तुमतें न मनिति । म्हणति आम्हि रायापासिं पिसें देतु असों । रावो आमुचे काय करिल । तुम्हि कोण्ही आमचे सरोवरिं न रहावें । तंव त्या राजेयानि न विचारितां । राजपुरुषांसि निरोपु दिधला । जें अवघे हंस धरुनि आणा । ते धरावया येतु देखौनि । वृद्ध पक्षियाचेंनि वचनें । येकेच वेळे उडौनि गेले । म्हणौनि तरि भुतांपासुनि घेतयां यैसें होये । मग तो राजा त्या हंसाचि खंति करि । यैसें ब्राम्हणु सांगे । मग प्रभातें त्या सांपापासिं दूध नेउनि म्हणे । जैसें माझेनि पुत्रें केलें । तैसें तो पावला । तरि तुवां क्षमा करावें । तंव तो सांपु म्हणे । तुवां या उपरि यैसें न बोलावें । तुं आपुलिया पुत्रासि मसणवटिं देखसि । मि आपुलिया फडेचा घावो आठवीन । आतां तुम्हांआम्हां मैत्रत्व न घडे । यैसे सर्पु त्या ब्राह्मणासि बोलिला । तरि तुं हा चिरंजीवी काउळा मंत्री मारिसिल । तरि अखंड राज्य करिसि । यैसें रक्ताक्षाचें बोलणें ऐकौनि राजा क्रूराक्षातें पुसे तंव तो म्हणे । हा निर्णयो जे निर्दय त्यांचा असे । माझ्या प्रत्ययासि येत नाहिं । शरणागतु न मारिजे । कपोताख्यात आईकिले नाहिं । राजा पुसे । क्रूराक्षु सांघे । म्हणे येकु पारधी क्रूर नामें । तो वनिं पांखिरुवें मारावयासि गेला । तंव तेथें थोर पाउस पडला । झाडिवारा तेणेंहि वेळा । रुखाखालि बैसला । तंव तेथें येकु होला होता । तयाचि होलि पाडसें घरीं न यति । म्हणौनि तो तिचें दुःख करि । म्हणे भार्येविण जीणें बोखटें । उक्तं च ।

नगृह गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते ।
गृहं हि गृहिणीहीनंमरण्यसदृशं च तत् ।। १६ ।।

यैसें दुःखार्त भ्रताराचें बोलणें आईकौनि । ते होलि पारधियातें धरुनि होलां घातलि होति । तंव ते म्हणे भर्तार भार्येचे गुण घेति । तरि तियेचें जिणें सफल । मग ते पांजरांहुनि भर्तारातें म्हणे यिं पारधीयें धरिलीयें असे । परि तुम्ही यैसें हें मनि न धरावें । हा तुझीया आश्रमा आला असे । यासि प्राणें हिं आतिथ्य करावें । परि याचा द्वेष न करावा । मी तरीं आपुलेनि कर्में बंधन पावलियें । परि तुवां धर्मु न संडावा । हें आईकौनि । तो होला खालि उतरला । तंव पारधी हीवें मुरकुडी जाला असे । पाउस राहिला । उघडलें । मग होला तया पारधीयातें म्हणे ।

तुं आमुचा अतिथि । हें घर तुझें असे । तुं सुखें राहे । आणि मिं काये करुं तें तुं सांग । तंव तो म्हणे अन्न होवा । तंव तो होला सुकलिं पानें घेउन आला । आणि अग्निची जळत काडी आणिली । तापु केला । तयाचें हिंव गेलें । तंव तो होला म्हणे तुं भुकेला असासि । परि मिं कांखिरुं । मज दैव नाहिं । जें तुज मीं अन्न देवों । तरि माझेंनि कांहिं येकि क्षुधा हरेलि । म्हणौनि होलियानें आपुणियातें । अग्निमध्यें घातलें । तें देखौनि लुब्धकु विस्मयो करि । म्हणे जळों माझें ज्यालेपण । तरि आतां मिं आपुलें शरिरा शोखिन । अग्नि रिघेन । म्हणौनि जाळें सांडिलें । आणि पांजरा तोडिला । लांकुड टाकिलें । झोळी संडिली । तंव ते होलि म्हणे । भर्तारेंविण जीणें नीकें नव्हे । कोंणिह हिं न मानिति । तंव तेहि अग्नि रिघालि । त्या दोघांसि विमान आलें । तें स्वर्गासि गेलीं । मग तो पारधी हि वना आंतु । दावाग्नि देखौनि आगि रिघाला । त्याचा हीनत्व-क्षय जाला । तो हि स्वर्गासि गेला । म्हणौनि शरणागतु रक्षावा । हें आईकौनि राजा दीप्ताक्षातें पुसे । तो सांगे । कोण्हे येके स्थानिं कामातुर म्हातारा वाणिया धनवंतु । तयाचि भार्या मेलि । मग तेणें आणिक कोण्हाचि कन्या धन देऊनि केलि । परि ते तयाचि वास न पाहे । कां जें बोलिलें असे ।

तंव येके दिवसिं दोघें निजेलें होतिं । परि ते कानवडि परांमुख निजेलि होति । तंव तेथें चोर तखान घालुं आला । तयातें देखौनि ते भ्यालि । आणि भर्तारातें आलिंगुनि राहिली । तंव तिचा भर्तारु विस्मो करि । भोंवतें पाहे तंव चोरु देखिला । तया चोरातें म्हणे तुझ्या उप-कारातें उत्तीर्णता नाहिं । तंव चोरु म्हणे तें कैसें । मग तो वाणियां म्हणे तुतें देखौनि माझि अस्त्रि भ्यालि । आणि मातें आलिंगिलें । तरि तुं हें धन घेउनि जाये । यैसें लटिकेचि अडगाईचाटाईनें बोलिला । म्हणे मिं आणिके ठायीं जोडिन । तंव तो चोरु म्हणे हे तुतें नालिंगी सुखें नसे । तरि मि मागुता होईन । यैसा तिस धाकु पडिला । इतु-कौनि ते सुखें असों लागली । तैसा हा चिरंजीवी राखिलियां उपयो-गासि येईल । वैरियांचीं वर्मे सांगेल । हें दीर्घाक्षाचें बोलणें आईकौनि राजा वक्रनासातें पुसें । तंव तो म्हणे हा न मारावा ।

शत्रवोपि न हंतव्या विवदंतः परस्परम् ।
चौरेण विजितं द्यूते राक्षसेन तु गोयुगम् ॥ १७ ॥

राजा पुसे । वक्रनासु सांघे । ब्राह्मणु येकु दुर्बळु देखौनि कोण्हे येके कृपा केली । गोयुग्म दिधलें । तें तेणें पोसिलें । थोर जालें देखौनि । चोरु चोरी करायासि निघाला । तंव वाटेसि राक्षेसी राक्षेसु देखिला । तयातें पुसे तुं कोणुं । तो म्हणे मि राक्षेसु ' तयातें तो पुसे । तंव तो म्हणे मि चोरु । ब्राह्मणांचें गोयुग्म चोरावया जातु असें । तंव तो म्हणे ब्राह्मणांस खाईन । म्हणौनि दोघे तेथें गेल । तंव तो ब्राह्मणु निजेला• असे । राक्षसु तयातें खावयास उठिला । तंवं चोरु त्यातें म्हणे । मि गोयुग्म नेईन । मग तुं त्यातें खाये । तंव तो राक्षसु म्हणे तें गोयुग्म नेतां चेईल । आणि श्रम् व्यर्थ गेला । तंवं तो चोरु म्हणे हा तुझेन चेइल तरि माझा श्रमु व्यर्थ होईल । येरु म्हणे मी अधि गोयुग्म नेईन । तंव येरु म्हणे मि त्यातें आधिं खाईन । यैसें दोघे झगडतां । तो ब्राह्मणु चेईला । तंव राक्षेसु म्हणे । हा गोयुग्म चोरावयासि आला । मग त्या ब्राह्मणें आपणेया रक्षा केलि । तेणें तो राक्षसु गेला । आणि हातीं लांकुड घेउन धाविनला । तेणें तो चोरु पळाला । म्हणौनि शत्रु हितालागिं होये । आणि शरणागतु न मारावा । हें हि प्रसिद्ध असे । हे मेघवर्णाचें वर्म उवडें करुनि सांघैल । उक्तं च ।

परस्परस्य मर्माणि ये न रक्षंति जंतवः ।
त एव निधनं यांति वल्मीकोदरसर्पवत् ॥ १८ ॥

राजा पुसे । वक्रनासु सांघे । कोण्हे येके नगारें देवशक्ति नामें राजा त्याचिया पुत्राचें उदरीं सर्पु असे । तेणें तयासि सुख नाहिं । त्या असुखें देशांतरा गेला । नगरा एका जाउन खांबाआड देउळिं जाउनि बैसला । तये नगरिंचा राजा बळि नामें । तयातें दोघी कन्या यौवनारूढा । त्या दोघी नित्य रायाच्या पायां पडेति । येकि म्हणे विजयी महाराजा । येकि म्हणे विहितं भुंक्ष राजा । हें आईकौनि । तया देउळिंच्या देशांतारियासि ते दिधिली विहितभोगु हणेते । तिया तो देव यैसें जाणौनु । त्यासि घेउनु । आणिका देशासि गेली । तंव मार्गिं जातां तिचा भर्तारु वावरुळ उसां घालौनु । निजेला । ते नगरांतुन कणिक तांदुळ तुप घेउनि आलि । तंव तयासि

निद्रा लागलि असे । त्याच्या तोंडांतुनु सर्पं बाहेरि काढौनि फडा केलि । आणि वावरुळातुनि हि सर्पु निघाला । तंव तो दुरुनि पाहाति असे तंव वावरुळिचें सर्पं उदरांतिल सर्पासि म्हणितिलें जें । या राजपुत्राचें शरिर कां पीडितोसि । तंव उदरिंचां सापें त्यासि उत्तर दिधलें । जें तुं वावरुळिं सांनटकियांची चरवी धरुनि राहिला आहेसि । तंव तो वावरुळिचा म्हणे जे तुज कांहिं वोखद कीजे । मोहरिया वाटुनि उन्हाणियासिं दिधलियां तुं मरसिल । येरु म्हणे तेल ताउनि वावरुळातें घातलियां तुं हि करपौनि बाहेरि पडासिल । तंव ते दोहिंचे शब्द तिया राजकुमरिनें आईकिले । आणि आईकौनि दोघांसि हि तैसेंचि केलें । ते दोघे सर्प मेले । तो राजपुत्र सुखी जाला । आणि धन हि पावलिं । हें आईकौनि रक्ताक्षु हांसौनि म्हणे । कैसा गोसावी भुलविला । अन्यावो तो सन्यावो करुनि दाखविला । उक्तं च ।

प्रत्यक्षेपि कृते पापे मुर्खः साम्ना प्रतुष्यति ।
रथकारः स्वकां भार्यां सजारां शिरसाऽवहत् ।। १९ ।।

मंत्री पुसति । रक्ताक्षु सांगे । म्हणे कोणे येके ठांई वाढई होता । त्याचि आंबुलि सिनलि । यैसा लोकापवादु ऐकौनि । वाढयें तियेतें राखों आदरिलें । मग म्हणे मिं गांवासि जाईन । यैसा सिदोरि बांधोनु तियेतें पुसौनु गांवासि गेला भर्तारु गांवासि गेला जाणौनि । संतोष मानुनि । तिया आपुला पाढियंता वोलउनि । आणिला । बाजेवरि बैसविला । आणि ते हि बाजेवरि बैसलि । तंव तियेचा पावो तयासि लागला । तंव तिया जाणितलें । आपला भ्रतारु येउनि बाजेखालि निजेला असे । तयावेगळें घरा आंतु आणिकु काण्हि येणार नाहिं । भ्रतारु होये यैसे निश्चयें जाणौनि । मग तया पढियंतियासि म्हणे आईकें । मिं जे देवतेसि पुजि । तिसि पूजा करितां । असिरणि वाचा जालि । म्हणे तुझा भर्तार मरेलि । आणि तुं रांड होसिल । हें आईकौनि मियां देवतेच्या पायां पडौनि विनविलें । जे माझें वैधव्य जाये आणि माझा भर्तारु शतायुषी होये यैसें करावें । तंव ते देवता म्हणे तुवां आणिकु पुरुषु आणावा । त्यासिं हाविंभाविं प्रीतिपूर्वक रमावें । इतुकेयानि तुझिये भ्रतारासि शतवर्षें आयुष्य होईल । म्हणौनु देवतेनें सांधितलें । त्यावरुनि तुज म्यां बोलाविलें । तरि

तुं मजासि सुख भोगि । मग तौ हांसौनियां निकियापरी तिस भोगि । मग ते म्हणे । आजिलागुनि तुवां माझेया घरासि यावें । माझा भर्तारु शतायुषी जाला । यैसें तया वाढयानें आईकिलें । इतुकेयानें तो खाटेबाहिर निघौनि । तिये सिनलीतें वानि । आणि आपुलिया खांदेयावरि वे । दुसरें खांदेयावरि तया सिनळातें घेउनि आपुलिया सोइरियांच्या घरासि गेला । म्हणे हे यैसी पतिव्रता । आणि मिं तुझेनि प्रसादें शतायुषी जालों । यैसा तो वाढई मूर्ख । प्रत्यक्ष पाप देखौनि दोषु नेणे । म्हणौनि सर्वस्व सहमूळ नासलें । कुळछेदु जाला । तऱ्है तयाचें वचन न करिच । मग अरिमर्दन राजा तया चिरंजीवीस घेउनि आपुलिया ठायासि गेला । तंव मार्गिं जातां चिरंजीवी अरिमर्दनातें म्हणे । मेघवर्णोसि वैर करावयासि मिं डुडुळु होईन । आणि अवघे काउळे मारिन । गोसांवियाकारणें मज मेघवर्णें यैसें केलें । तरि मिं आगि रिघैन । तवं रक्ताक्षु म्हणे । आगि रिघालियां काय काज । तंव चिरंजीवी म्हणे । काउळे मेरेति यैसें देवातें मागैन । तंव तो रक्ताक्षु म्हणे । तुं वशीकरण बरवें बोलणें जाणसि । डुडुळुयोनि तुं कांहिं मानिसि । वायसयोनि बहुत हें झणें न मानिसि तरि कथा आईकैं ।

सूर्यभर्तारमुत्सृज्य पर्जन्यं मारुतं गिरिम् ।
स्वयोनिं मूषकी प्राप्ता स्वजातिर्दुरातिक्रमा ॥ २० ॥

चिरंजीवी पुसे । रक्ताक्षु सांगे । वाल्मिक ऋषेश्वर गंगेस तर्पण करित होता । तंव ससाणेयाचे तोंडीहुनि उंदीरी सुटली । ते वाल्मीकाचे आंजुळींत पडली । तवं त्यासि कृपा उपनली । तेणें आपुलें तपोबळें ते कन्या केलि । आश्रमासि नेउनि भार्येसि दिघलि । तिया लेंकी म्हणोनि वाढविली । प्रबुद्ध जालि देखौनि । भर्तारातें म्हणे । इयेचा विवाह करावा । तंव ऋषीश्वर म्हणे उक्तं च ।

ययोरेव समं वित्तं ययोरेव समं कुलम् ।
तयोर्विवाहः शस्यः स्यान्नतु श्रेष्ठकनिष्ठयोः ॥ २१ ॥

यैसें म्हणौनि । मग ते कन्येतें पुसे । तुज कोणासि देवों । तंव ते म्हणे अवधियांतु चांगु । त्यास दे । तंव ऋषीमध्यें सूर्यो बोलाविला । तो तत्काळ आला । मग ते कन्येतें पुसिलें । यासि देवों । तंव ते म्हणे

हा उष्णु फार । हा माझेया प्रत्ययासि नैये । याहुनि थोर तो बोलावि । तंव सूर्यातें पुसिलें । तुजहुनि उच्च कोणु । तो म्हणे मेघु । ऋषेश्वरें मेघु बोलाविला । तो आला । तंव ते म्हणे हा काळा । तंव मेघातें पुसिलें । तुजहुनि कोणु अधिकु । तंव ते म्हणे वायो । मग वायो बोलाविला । तो आला । तंव ते म्हणे हा चपलु । मग तयातें पुसिलें । तुजहुनि कोणु थोरु । तो म्हणे डोंगरु । तंव डोंगरु बोलाविला । तो आला । ते म्हणे हा दगडु । मग तयातें पुसिलें । म्हणे तुजहुनि कोणु अधिकु । तंव तो म्हणे उंदिरु । तंव उंदिरु बोलाविला । मग ते म्हणे हा होये । यातें उंदिरातें वर कारि । इतुकेन मी सुखी असैन । मग ऋषीनें तैसेंचि केलें । तरि ते सूर्यो संडौनि स्वजातिसि उंदिरी गेली । तैसा तु रे चिरंजीवी म्हणौनि रक्ताक्षें म्हणितिलें । परि त्याचे कोण्ही नाइकेति च । मग चिरंजीवीतें घेउनी आपुलिया दुर्गासि स्वनाशालागिं नेला । तंव चिरंजीवी मनिं विचारि । रक्ताक्षाचें म्हणितिलें न कारि च । आतां सुखेंचि अवघे नाश पावति । दुर्गि पावलिया अरिमर्दन म्हणे । या चिरंजीवीस हा म्हणैल तेथें असों देवो । यैसें हें रायाचें वचन ऐकौनि चिरंजीवी मानिं विचारि । म्हणे दुर्गाआंतु वसता । यांचा वधु उपावो करतां नैये । तरि दारवटां चि राहों । यैसें विचारुनि । अरिमर्दनातें म्हणे । मीं गोसांवीयांचे दारवटांचि राहिन । गोसावियांचे चरणरजें मिं पवित्र होईन । म्हणौनि दारवंटाचि राहिला । तयासि भक्षावया अरिमर्दनाचेनि निरोपें मांस उदंड देति । तें खाउनु मोठा जाला । मांजरायेव्हडा जाला । यैसा थोरला देखौनि । त्या रक्ताक्षें राजेयातें म्हणितिलें । तुं मूर्ख । यैसें मीं जाणतु असे । उक्तं च ।

पूर्वं तावदहं मूर्खो द्वितीयः पाशबद्धकः ।
ततो राजा च मंत्री च सर्वं च मूर्खमंडलम् ॥ २२ ॥

ते अवघे पुसति । रक्ताक्षु सांघे । म्हणे कोण्हे येके पर्वतिकोनीं थोरला वृक्ष असे । तेथें पक्षी बहुत असति । तेथें पारधी येकु आला । तंव पक्षिये येकें विष्टा केलि । तें सोनें देखौनि पारधीये विस्मो केला । म्हणे मीं ऐशीं वरुषें पारध करितों । परि पांखरुं सोनें विष्टा करितां देखिलें नाहिं । तरि यातें धरुं । म्हणोनि त्या वृक्षि पाश घातले ।

तो पक्षी पाशिं पडला । मग पारधिये पाश सांडौनि तो पाक्षि घरासि आणिला । मग पारधी विचारी । म्हणे या पाखिराचें वर्तमान कोण्हि रायापासिं सांघैल । तरि मग वोखटें । म्हणौनि तेणें तो पक्षि नेउनि रायासि दिधला । हा सोनें हागतो म्हणौनि सांगितलें राये त्या पक्षियासि अन्न पाणि देउनि राखिला । तंव मंत्री म्हणति । पारधी लटिका । हें पांखिरुं सोडा । रायें त्या मंत्रियांचे बोलें तो पक्षी सोडिला । तो उडौनि जाउनि द्वारतोऱ्यावरि बैसला । तेथें तेणें विष्टा केलि । तंव तें सोनें । मग उडौनि गगनमार्गें गेला । पूर्वं तावदहं मूर्खो ऐसा श्लोक पढे । परी त्या रक्ताक्षाचें वचन कोण्ही नाईकेति । दैव प्रतिकूळ जालें म्हणौनि कोण्हि नाईकेति च । मग त्या रक्ताक्षासि अनादरु केला । माघुती तयाचि परि चिरंजीवीतें पाळूं लागले । तें देखौनि रक्ताक्षु आपुलिया सोइरियांतें आणि परिवारातें म्हणे । हा राजा भुलला असे । आणि मंत्री हि भुलले । माझें वचन न करितिच । तरि यांसरिसे आपण हि नाशु पावोन । म्हणौनि सह परिवारीं आणिकिया दुर्गासि जाईजे । तरि च वांचिजे । म्हणौनि श्लोक पढे ।

अनागतं यः कुरुते स शोभते स शोचते यो न करोत्यनागतम् ।
वने वसन्नेकजपामुपागतो बिलस्य वाचा न कदापि हि श्रुता ॥ २३ ॥

तयाचा परिवारु पुसे । रक्ताक्षु सांगे । कोण्हे येके वनि खरनखरु नामें सिंहु । तो भुकेला । हिंडतां येकि दरि देखिलि । तेथें रिघाला । मनिं म्हणे येथें रात्रिं कोण्हि येईल तयातें खाईन । तंव दरीमध्यें दधिमुख कोल्हा वसे । तो रात्रिं येउन ते गुहेचे दारिं भुंकिनला । म्हणे अहो बिळ अहो बिळ । अगा सांगातिया तुवां मतें [illegible]विलें । म्हणौनि मिं आलों । तुं मजसि न बोलेसि तरि मि आणिका [illegible]सि जाईन । तंव तो सिंहु मनिं म्हणे । मज भेणें नैये । म्हणौ[illegible] [illegible]वला । तंव सिंहाचे शब्दें पडिसादु थोरु जाला । तेणेंकरुनि अवघि श्वापदें भ्यालिं । आणि पळालिं । तो कोल्हा हि पळाला । आणि जीवें[illegible] [illegible] । म्हणौनि म्हणे अनागतविधाता सुख पावे । येसें म्हणौनि [illegible]क्षु परिवारासमवेत आणिका दुर्गासि गेला । रक्ताक्षु गेलियावरि चिरंजी[illegible] [illegible]रिखेला । म्हणे ढुढुळु सुखें मारवति । म्हणौनि तापावयाचे [illegible] । नित्य येकि दोनि काठि

मेळउनि त्या ढालाचिये दारिं ठेवि । यैसिया बहुत मेळविलिया । इतुकेनि दिवसा डुडुल आंधळें होति । ते ढोलारिं रिघोनु राहाति । इतुकेनि चिरंजीवी मेघवर्णापासि जाउन म्हणे । वैरी मराति यैसें मियां केलें । तंव तो मेघवर्णु म्हणे वृत्तांतु सांघैं । तंव तो म्हणे आतांचा समयो नव्हे । मग सांघों । तुम्हि अवाघें वणवीयांचीं जळतीं घेउनि यांवें । म्यां ढोलाचे दारिं काढियां घातलिया आहेति । तेथें आगि लावावा । तेंहिं तैसेंचि केलें । मग ते अवघे डुडुल रक्ताक्षाचें वचन आठविति । न विश्वसेत्पूर्वविरोधितस्य । इत्यादि । मग ते कुंभिपाक होउनि ढोलारासहित जळैनि मेले । मग तो मेघवर्णु सुखें राज्य परिवारासहित करों लागला ।

इति श्रीविष्णशर्मविरचिते पंचोपाख्याने काकोलूकीयं नाम तृतीयं तंत्रं समाप्तं ।

---

# पंचतंत्र.

## चतुर्थतंत्र—लब्धप्रणाश.

आतां चौथें तंत्र सांविजैल । उक्तं च ।

> प्रातव्यमर्थं यो मोहाच्छांत्वानः प्रतिमुंचति ।
> स तथा वंच्यते मूढो मकरः कपिना यथा ॥ १ ॥

राजपुत्र पुसति । विष्णुशर्मा सांगे । म्हणे समुद्रातीरें सदाफळ जांबुळवृक्ष असे । तेथें रक्तमुख नामें वान्नरु वसे । तंव त्या समुद्रांतुनु । विकराळ नामें सुसरु । तेथें जांबुळबुढि वाळसरा असे । तेथें येउनि बैसेला । तयातें देखौनि वान्नरु म्हणे । तुं आमचा अतिथि । म्हणौनि जांबुळें त्या मकरासि दिधलिं । तंव तो नित्य येउनि तेथें वृक्षाखालें बैसे । आणि तयासि वान्नरु जांबुळें देतुसे । यैसि दोघांसि प्रीति मित्रत्व जाहालि । ते येकमेकांसि गोष्टि करिति । खातां जांबुळें उरति तीतुर्कि तो सुसरु घरासि आणि । आणि आपुलियें स्त्रियेसि देतु असे । तंव तिया स्त्रिया मगरासि पुसिलें । म्हणे हें अमृतोपम फळें कैंचि । तंव तो म्हणे माझा मित्र वान्नरु । तो मज देतुसे । तंव ते म्हणे त्याचें हृदय अमृतोपम असैल । जो यैसिं फळें नित्य खाये । तरि त्याचें हृदईचें मांस मज आणौनि द्यावें । तें मि खाईन । आणि बरवी तरुणीं हीं होईन । तुजसि सुखें रमेन । तंव तो म्हणे । तुं यैसें बोलों नको । तो माझा परम मित्रु । यैसें करितां पाप बहुत असे । तंव ते म्हणे ते वानरि असैल । आणि तुं तयेसिं रातलासि । तंव तो म्हणे मि तुझा पाईकु । सेवक । तुझिया मि पाया पडेन । मग ते म्हणे मि अनाशनव्रत घेईन । पारि ते दुराग्रह न संडि । मग तो तियेतें म्हणे । तो तरि वान्नरु शाखामृगु । आणि मि तरि जळचरु । तो मज कैसेनि मरवेल । तंव ते म्हणे तो नाणि तरि मिं मरेन । इतुकेनि तो वान्नरापासिं मगरु आला । तंव वान्नरु पुसे तुज उसीरु कां लागला । तंव तो म्हणे । तुझिया भाउजया । मातें निर्भर्छिलें । म्हणे यैसीं फळें तुझा मित्रु तुज देतुसे । तरि तुं त्यासि घरासि कां नाणिस । उपकारासि तुं प्रत्योपकार कां न कारेस । तारि तुं

यैसा कृतघ्नु । तुज प्रायश्चित्त पाहिजे । म्हणौनि तरि तुं आमुच्या घरासि चाल । तुज पाहुणचाराचि आईत केलि असे । मग तो वान्नरु म्हणे मि पाणियांतु कैसोने येवों । तंव म्हणे माझीये पाठिवरी बैस । तंव तो बैसला । दोघेहि निघाले । वाटे पाणियांतु जातां वान्नरु म्हणे । सुसरातें । तुं हळुहळु चाल । तंव तो सुसरु मनिं म्हणे । आतां वानरु तरि वश्य जाहाला । आतां पाणियांतु काये करील । तरि या बापुडियालि मनिंचें गुह्य सांगों । मग तयातें म्हणे । माझे भार्येनें । तुझें हृदय खावयालागि आणविलें असे । तरि तुं इष्टदेवता—कुळदेवतेचें स्मरण करिं । तंव तो वान्नरु अति विपन्नमति । म्हणे सांगातिया मज तेथेंचि न संगसि च । मि हृदय जांबुवरि ठेउनि आलों असे । तरि चाल मागुता । तें हृदय घेउनि येवों । तंव त्या सुसरें होकां म्हणितिलें । म्हणौनि तो मागुता परतौनि जांबुपासिं आणिला । तंव तो वान्नरु उडौनि जाउनि शिखरिं बैसला । सेंडियावरी गेला । म्हणे आजि मि उपजलों । वांचलों । दुसरा जन्म पावलों । मग तो मगरु म्हणे बाळमित्रा तुझि भाउजई वाट पाहात असेलि । तरि हृदय घेउनि सीघ्र ये । ते भुकेलि असेलि । मग तो वान्नरु म्हणे । अरे विश्वासघातकिया ते मरो आणि तुं हि मर । या जांबुढि-हुनि तु जाये । म्हणे मूर्खा दोनि हृदयें कोठें कोणासि असताति । तंव मगरु मनिं म्हणे । म्यां वोखटें केलें । जें यासि अभिप्रावो सांगितला । तरि आतां मागुता विश्वासवीन । म्हणे मित्रा मि तुज चालवित होतों । तरि तुं काये म्हणतोसि । तंव वानरु म्हणे रे दुष्टा मि न यें । उक्तं च ।

बुभुक्षितः किं न करोति पापं । क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति ॥
आख्याहि भद्रे प्रियदर्शनस्य । न गंगदत्तः पुनरेति कूपम् ॥ २ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । म्हणे कोणे येके आडिं । गंगदत्त नामें बेडुकांचा राजा वसे । तो दयाजीं पराभविला । तो राहाटगडगियावरि बैसोनु बाहेरि आला । मग तो दायिजांचा वधु चिंतितु असे । तंव प्रिय-दर्शन नामें कृष्णसर्पु । तो आपुलिये वोहियेबाहेरि रिघतां देखिला । तेथें तो गंगदत्तु बेडुक येउनि म्हणे । अगा ये प्रियदर्शना । म्हणौनि बोभा-ईला । तें आईकोनि सर्पु पुसे । मनिं विचारि । म्हणे सर्पाचियासारिखा शब्दु नव्हे । तरी हा कोणु । तंव तो म्हणे मिं गंगदत्तु । अवघियां

बेडुकांचा राजा । तुजतीं सख्य आलों । तंव तो म्हणे तुज काय व्यसन । तंव येरु म्हणे दायाजीं पराभविलों । तंव तो म्हणे तुं आमचें भक्ष । आम्हांतुम्हां मित्रत्व केउतें । तंव तो म्हणे हें साच । पारि न करावें तें करणें लागतें । मग तो सर्पु म्हणे मि कोणे वाटे त्या आडामध्यें येवों । तंव येरु म्हणे मि नेयीन त्या वाटे ये । आणि वरवें स्थान असे । तेथें तुं राहे । मि जयातें खाये म्हणैन तयातें तुं खाये । परी माझे सोईरे ते न खाये । यैसें गंगदत्तें प्रियदर्शनासि म्हणीतीलें । तंव तो मानिं विचारि । म्हणे मि वृद्ध । अनायासें भक्ष मिळतें । तें कां अंगीकार न करावा । यैसें म्हणौनि वोहियेबाहेरि निघाला । म्हणे होकां तुं ज्यासि खाये म्हणीसील त्यासि च मि खाईन । यैसें म्हणौनि तया आडाआंतु दोघे गेले । जयातें गंगदत्तु दाखवी । तयातें तो खाय । यैसे अवघे दाईज खावविले । मग तो गंगदत्तु म्हणे आतां माझें कार्य जालें । आतां तुं येथुनि जाये । तंव तो म्हणे मि आतां कोठें जावों । म्हणे माझिये वोहियेंत आणिकु सर्पु रिघाला असे । तरि येखादें नासलेसें असेल । अथवा रोगिष्ट अथवा वृद्ध । यैसें येखादें असोलि तें मज देत जावें । मि तितुकियें सुखें असैन । तंव गंगदत्तु मनिं विचारि । म्हणे म्यां वोखटें केलें । यैसें विचारुनि दिसवडि येक येक बेडुक दे । तें तो खाये । आणिक येक दोनि चोरुनि हि खाये । यैसे अवघे बेडुक खादले । येकला गंगदत्तु उरला । मग त्यातें सर्पु म्हणे । मि भुकेलों असें । मज भोजन दे । तुवां मातें येथें कां आणिलें । तव तो गंगदत्तु म्हणे । मातें पाठवि । मि आणिका ठायासि जाईन । तेथील बेडुक तुजकारणें आणिन । तें तया सर्पें मानिलें । मग तो गंगदत्तु जाउनि येके जळिं राहिला । बहुत वेळु जाहाला । पारि तो न ये चि । ते वेळेसि एकि घोरपड होति । ते सर्पें बेडुकापासिं पाठविलि । कोण्हि बेडुक न येतिल । तरि तुं तन्हि वेगीं येणें । तंव ते गंगदत्तासि म्हणे । तुज प्रियदर्शन बोलावितो । तरि तुं चाल । तंव तो म्हणे तया वाटे न ये । उक्तं च ।

बुभुक्षित: किं न करोति पाप । क्षीणा नरा निष्करुणा भवन्ति ॥

आख्याहि भद्रे प्रियदर्शनस्य । न गंगदत्त: पुनरेति कूपम् ॥

म्हणौनि तो गंगदत्तु न ये चि । तैसा मि नयें । तुं जाये । तंव तो मगरु म्हणे तुं न येसि तरि मि उपवासिं असैन । मग तो वान्नरु म्हणे । मि काये लंबकर्ण । मरण देखतां मि येईन । उक्तं च ।

आगतश्च गतश्चैव दृष्ट्वा सिंहपराक्रमम् ।
अकर्णहृदयो मूर्खस्तेन मृत्यवशं गतः ॥ ३ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । म्हणे कोण्हे येके वनिं कराळकेशरी नामें सिंहु । त्यासि गजेंसिं झुंझतां घाये लागले । तेणें तयासि गुंफेबाहेरि न निघवे । तयाचा पाईकु कोल्हा धुशक नामें । तेणें सिंहातें म्हणितिलें । जि मि उपवासिं चालों न सकें । आणि माझेनि सेवा नव्हे । तंव सिंहु म्हणे तुं येखादा प्राणियां पाहे । यैसा हि मि तयातें मारीन । तो पाहावया गेला । तंव येके गांविं नदितीरीं थडियेसि । लंबकर्ण नामें गाढउ दुर्बेलु । यैसा चरतु देखिला । तंव तयातें तो धुशरु कोल्हा म्हणे । मामो माझा नमस्कार । सां पें तुम्हि रोड कां । तंव तो म्हणे परीट मज पोटभरि गवत न घालि । भुई भुरकीतु असें । म्हणौनि मि रोडु असें । तंव तो कोल्हा म्हणे तरि तुं मजसांगातें चाल । तेथें हि तृणपाणि बरवें असे । दोघे हि सुखें असों । तंव तो म्हणे तें अरण्य भयानक । दुष्ट स्वापदें मज खाति । तंव तो कोल्हा म्हणे मजभेणें तेथें कोण्हि न येति । आणिक तेथें तीन गाढवी भ्रतारेविण असति । तिहिं मातें म्हणितिलें असे । म्हणे आम्हांयोग्य भ्रतारु आणावा । म्हणौनि मि तुजजवळिं आलों असें । हें वचन आईकोनि । गाढउ कामातुर होउनि । सिष्ण काढुनि । त्या सांगातें निघाला । तंव त्या कराळकेशरिसीं हें । लंबकर्ण गाढव येतां देखिला । अधीरपणें तो तयातें मारुं धांविनला । तंव तो देववशें न मरवे चि । पुंस वरते पळाला । सुटला । मागुतें परतोनि पाहे । तंव रक्तांबर डोळे भयानकु देखौनि भुंकतु मागुता पळाला । पळतु आपुलिया गांवासि आला तंव तो कोल्हा सिंहातें म्हणे । भला जाणितलासि । तुझेनि गाढव न मरवेचि । तंव सिंहु म्हणे गज मारितियासि गाढव कां न मरवे । परि तुं मज सावध न करिसि च । तंव तो कोल्हा म्हणे । मि मागुता त्यासि आणितों । तुं सावधान होये । म्हणौनि तो कोल्हा धुशरू मागुता त्या गाढवापासिं आला । म्हणे मामो

तुं कां पळालासि । तंव तो म्हणे गोमव्या ठायासि नेलें होतें । तें भयानक को सावज । तंव तो कोल्हा म्हणे हांसोनिया बोले । म्हणे ते गाढवि शृंगार करुन तुज आलिंगन द्यावया आलि । आणि तुं भेडपणें पळालासि । आतां ते म्हणते तो येईल तरिच । चारापाणि घेइन । नाहिं तरि उपवासि मरैन । आतां तुं जरि न येसि तरि तुज स्त्रिहत्या घडेलि । आणि कामु कोपैल । तयाचें वचन आईकौनि दोषु देखिला । आणि पुडति तयापासिं गेला । तंव तो सिंहें सावधपणें मारिला । कोल्हा तेथें राखण ठेउन आपण नदिस जाउनि आला । तंव कोल्हेनि त्याचें हृदय कान खादले । सिंहु तयातें म्हणे तुंवा उच्छिष्ट केलें । कान आणि हृदय खादले तंव तो कोल्हा म्हणे । त्यासि हृदय आणि कान नव्हते म्हणौनि पळोनु गेला असतां मागुता आला । तें वचन सिंहाचे प्रत्ययासि आलें । मग तें दोघीं वांटुनि खादला । तरि मीं यैसा मूर्ख नव्हे । जें तुझिया लटिकें शब्दें चालेनि । तुंवां तरि कपट केलें होतें । परि सत्य बोलोनियां नाशिलें । जैसें युधिष्ठिरें कुंभारें नाशिलें । उक्तं च ।

स्वार्थमुत्सृज्य यो दंभी सत्यं ब्रूते स मंदधीः ।
स स्वार्थाद्भ्रश्यते नूनं युधिष्ठिर इवापरः ॥ ४ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । म्हणे कोण्हे येके गांवि युधिष्ठिरु नामें कुंभारु होता । तो मातला । उन्मत्त जाहला । घरासि येतां आवियापासिं पडला । कांठमोरा त्याचे निडळीं रुतला । खांडेयाचा घावो होये यैसा वण पडला । तो दुकळेंकरूनि राजपुत्रासांगातें नगरा येका जाउनि रायातें वोळगे । तंव तो रावो समोर ललहाटि घावो देखौनि । हा लाठा जुंझारु म्हणौनि धनमानें अधिकु लोभ करि । कोण्हे यके वेळे जुंझसमई तया युधिष्ठिरातें रायें पुसिलें जें तुं कोणे ठाईंचा । आणि कोणाचा पुत्र । हें सांग । आणि तुं कोण्हासि जुंझिनलासि । निडळीं घावो तुज कैसेनी लागला । तंव तेणें म्हणतिलें जें मि कुंभारु । मातलों । आवेयापासिं पडलों । कांठमोरा माझे निडळीं रुतला । हें ऐकोनि राजा तयातें म्हणे तुझिया कपाळिंच्या वणोंनि सितरलों । म्हणे आतां यासिं गचि देउन

दवडा । तंव तो कुंभारु म्हणे जुझि माझें लाठेपण पाहा । तंव रावो म्हणे तुं सर्वज्ञ संपन्न । परि तुं येथुनि जाये । उक्तं च ।

शूरोऽसि कृतविद्योऽसि दर्शनीयोऽसि पुत्रक ।
यस्मिन्कुले त्वमुत्पन्नो गजस्तत्र न हन्यते ॥ ५ ॥

कुंभारु पुसे । राजा सांगे । कोण्हे येके वनिं सिंहीण व्यालि । दोनि पिलीं जालिं । सिंहु आहारु आणौनि दे । ते लेंकरयांतें राखाति राहे । येकु दिवस आहार न मीलेचि । विळच्यां येक कोळियाचें पीलें । तें न मारि च । घेउनि आला । मग ते पीलें सींहिणीतें दीघलें । तिया कृपावशें । आपुलिया स्तनीं लाउनी वाढविलें । येके वेळे हस्ति आले । तयातें देखौनि सींहाचें पीलें हस्ति मारावया धाविनलें ! येर ते पळोनि गेले । तेणें पळ काढिला । तयातें सिंहाचें पिलें कोपलें । म्हणे तुं पळाळासि । तंव कोल्हियाचें पिलें कोपौनि सिंहाचे पिलियांसि मारूं लागलें । सिंहिणीनें वारिलें । म्हणे तुम्ही भांडों नका । तंव तो म्हणे मि काय शूर नव्हे । कीं बरवा सुंदर नाहिं । किं मज विद्या नाहिं । तरि हे मातें कां हांसाति । तंव ते सिंहिण म्हणे । तुं सुंदर बरवा आहेसि । विद्याहि जाणसि । अवघें जाणसि । परि जिये कुळिं जन्मलासि तिये कुळिं गज न मरवे चि । सिंहिणी म्हणे तु कोल्हियाचें पिलें म्या कृपावशें तुज वाढविलें । हे तुतें कोल्हा यैसे जाणति तरि तुज मारिति । तरि तुं आपुलिये जातिपासिं जाये । सुखें अस । तंव तो भ्याला । आणि पळौनि गेला । तैसा तुं हिं जाये । तुं कुंभारु येसें जाणति । तरि हे वीर तुतें मारिति । जो दंभकार्य करि । तो आपुले हृदईचें गुप्त न संवे । तरि तुं स्त्रियेचे वचनें यैसें करून कार्य नासिलें । याउपरी तुझ्या वचनांचा विश्वासु कोण्हि न करि । उक्तं च ।

यदर्थे स्वकुलं त्यक्तं जीविताधं च हारितम् ।
सा मां त्यजति निःस्नेहा कः स्त्रियं विश्वसेन्नरः ॥ ६ ॥

मगरु पुसे वान्नरु सांगे । कवणे येके स्थानिं ब्राह्मणु येक असे । तयासि वऱ्हाडिका जाळि । ते ब्राम्हाणि अति पढियंति । ते अवघियां सोइरियांसि भांडे । मग तो ब्राम्हणु अवघे कुटुंब सोडुनु तियेतें घेउनि देशांतरें निघाला । वाटेसि जातां ते तान्हेलि । तो तियेलागिं पाणि आणावया गेला । तेणें पाणि आणिलें । तंव ते तृषा हृदयस्फोट होउनि मेली ।

इतुकेने तो ब्राह्मणु दुःख करितां । मग निवाचा जालि । म्हणे तुं अर्ध आयुष्य दिधलें । इतुकेनि ते जिआलि । तिस जीउ आला । मग ते पाणि प्यालि । मग तें दोवें येकीया नगरीं फुलमलां राहिलि । तियेसि मळियांत ठेउनि आपण गावांतु गेला । तंव ते मळियांत येक कुब्जकु देखिला । तो फुलमला राखतु होता । तो माहासुंदरु । तेणें तियेतें गातां आईकिलें । मग तो तेथें आला । तो हि गंधर्वकळा जाणे । यैसा दोघांचा संवादु जाला । पुरुष आणि स्त्रि येकांतीं असिलियां । पुरुषासि विकार जाणवले । इंद्रियें जागृत जालिं । मग त्यां दोवांसि संयेग जाला । मग ते तया कुब्जकातें म्हणे । मि जिन तोंवरि तुतें न संडि । इतुकें दोवांसि प्रमाण जालें । तंव तो ब्राह्मणु अन्न घेउनि आला । तें दोघें जेउं बैसलिं । तिया त्या ब्राह्मणातें म्हणितिलें । पैल खुजा बैसला आहे । तो भुकेला असे । त्यासि अन्न दे । तेणें दिधलें । मग जेउनि गावांसि निवतां ते म्हणे । आम्हांस कोण्हाचा सांगातु नाहिं । तरि हा खुजा सांगातें नवों । तंव तो खुजा म्हणे मज न येवें । तंव ते म्हणे मि नेईन । म्हणौनु पेटारि शरविलि । पेटियेत त्यासि घालुनि घेउन निघालिं । तंव येकें नगरीं ब्राह्मणांचे घरिं वृंदावनाजवळीं राहिलीं । तेथें आड होता । त्या अडाचें कांठि भ्रतारु निजविला । आपण मध्यें निजेलि । पलिकडे खुजा निजविला । तंव ब्राह्मणासि झोंप लागली । त्यासि तिणें आडामध्यें लोटिलें । आणि खुजा घेउनि निघालि । तंव नगरा येका जातां । सुंकीयें डोईचे पेटारींत काये आहे म्हणौनि हीरोन घेउन नगरीचे रायापासिं नेली । उघडुनि पाहाति तंव भीतरि खुजा देखिला । तंव ते हि मागेलेकडुन रडत आलि । तंव रायें तियेसि पुसिलें । हा खुजा कोणु । तंव तें म्हणे माझा भ्रतारु । दायजि दवडिलें । मग मि पेटियेंत घालुनि तुजपासिं कांहिं मागावियासि । येत होतें । तंव तो रावो म्हणे हे बापुडि पतिव्रता । मग रावो म्हणे तुं माझि बहिण । म्हणौनि तिस दोनि गांव दिधले । मग तें दोवें सुखें असों लागलिं । तंव ब्राह्मणु कोण्ही येकें कूपावरों । अडाबाहेरि काढिला । तंव तोहि त्याचि नगरासि आला । तयातें देखौनि तें राया म्हणे । हा माझिया भ्रताराचा वैरि । तें आईकोनि रायें तयातें मारु आदरिलें ।

तंव तो म्हणे तुं राजा धर्मिष्ठु । हे माझें लागती असे । तें माझें मज देववि । इतुकेनि मारिसिल तरि मारि । मग तियेतें रायें म्हणतिलें । याचें काये लागत आहेसि तें दे । तंव ते म्हणे मि कांहिं लागत नाहिं । तंव ते म्हणे माझें अर्ध आयुष्य घेतलें आहे तें दे । त्या रायाचे भयें म्हणीतलें घे । यैसें बोलतखेवों ते मेलि । तंव तो राजा त्या ब्राह्मणातें पुसे । म्हणे हें काय । मग त्या ब्राह्मणें अवघा आपुला वृत्तांतु सांगीतला । म्हणे जियेकारणें म्यां आपुलें । अवघें कुळ सोडिलें । आणि अर्ध आयुष्य दिधलें । ते यैसि । मग राजेयानि त्या भटाचा श्रमु हरिला । तरि स्त्रियेचेनि सांघातें यैसें होय । पुडति वान्नरु श्लोक पढे । उक्तं च ।

किं न दद्यात्किं न कुर्यात्स्त्रीभिरभ्यर्थितो नरः ।
अनश्वा यत्र हिंसन्ते शिरोऽपर्वणि मुंड्यते ॥ ७ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । कोण्हे येके नगरीं नंदु नामें राजा । तयाचा प्रधानु वररुचि । त्याची भार्या रुसलि । बुझावितां न बुझावे । मग तेणें म्हणतीलें । तुं जें म्हणसिल तें मि करिन । तंव ते म्हणे डोई बोडावी । काळि तांबडि पांढरि ठिपकिं लावावि । पायां पडावें । तुझे तोंडि मि कडियाळें घालुनि । तुज घोडा करीन । आणि मि तुझे पाठिवरि बैसेन । मग तुवां धांवावें । घोडियाचे परी हिंसावें । मग त्या वररुचिन तैसोचि केलें । तेणें करुनि ते बुझावलि । प्रभातें रायापासिं गेला । तंव रायें म्हणितिलें काये वररुचि । पर्वणिविण डोई बोडिलि । मग तो म्हणे स्त्रियेकारणें आर्तिकु नरु काय न करि । वररुचिच या परि । स्त्रिवचन प्रगटलें । उक्तं च ।

सुगुप्तं रक्ष्यमाणोऽपि दर्शयन्दारुणं वपुः ।
व्याघ्रचर्मपरिछन्नो प्राकृतो रासभो यथा ॥ ८ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । परिटा येकाचें गाढव रोडिकें देखौनि चारियालागिं वनांत हिंडतां । व्याघ्र मेला देखिला । तयाचें चर्म आणौनि त्या गाढवाचे आंगीं घातलें । आणि रात्रि कौण्हियेकाचे सेतिं सोडिलें । तंव ते सेतकरि व्याघ्र म्हणौनि पळति । तो सुखें चरे । यैसें नित्य करितां मोठा जाला । येके दिवसिं गाढवांचा शब्दु आईकिला । आणि हा गाढव

भुंकों लागला । तंव सेतकरीं तो गाढवसें जाणौनि धांवोनि येउनि मारिला । तैसें विकराळ सुसरा तुझें तुवा केलें । तंव एकु जळचरु येउनि सांघे । म्हणे मगरा तुझी भार्या अनशनें मेलि । तें आईकोनि तो दुःख कारि । वानरातें म्हणे । म्यां तुजसि अन्यावो केला । तो मज उपसहावा । आतां मि तिचेनि वियोगें अग्नि रिघैन । तंव वान्नरु हांसोनि बोले । म्हणे त्यातां जाणितिलासि तुं स्त्रीजीतु । मुर्ख । यैसी स्त्री वोखटी । दुष्ट मेलिया हर्ष करावा । तंव मगरु म्हणे साच । पारि दैवहतु । येक तारि भार्या मेलि । दुसरें तुजसि मित्रत्व होतें तेंहि गेलें । उक्तं च ।

याद्दश्यं मम पांडित्यं ताद्दशं द्विगुणं तव ।
न जारो न च भर्ता च जले तिष्ठसि नग्निके ॥ ९ ॥

वानरु पुसे । मगरु सांगे । कोण्ही येक वृद्ध पुरुषु । त्याचि भार्या पुंश्चलि । तिस वृद्ध भर्तारु नावडे । ते अखंड परपुरुषीं रत । धूर्तें येकें जाणौनि तियेतें म्हणे । मि कामातुर असें । तुं मज राति दे । माझी भार्या मेलि । तंव ते म्हणे हें अवघें धन घेउनि दोघें हि आणिका देशासि जावों । आणि सुख भोगों । माझा भर्तारु वृद्ध । पाउलभरि चालों न शके । तंव तो म्हणे हो कां । ऐसें म्हणौनि रात्रिं धन अवघें घेउनि । तया संगें निवालि । वाटेस जातां गावां येका गेलि । तंव पुढें नदि भरलि जाति असे । यैसें देखौनि तो मानिं विचारि । म्हणे ये अघोडिविण मज कोण कार्य । ईपासुनि धन घेवों । आणि जावों । धांवणें आलियां इसंगें मज मरण यईल । तारि इतें म्हणों जे यै नदिचें पाणि गडाड । तर आधिं अवघी मात्रा व तुझिं वस्त्रें पैलाडि ठेउनि येवों । मग आपण दोघें सुखें उतरवैल । यैसें तिस फेटउन । मात्रा व लुगडिं पैलिकडे घेउनि गेला । तो तैसा चि परता चि गेला । तंव ते नागवीं गळां हात पोट लुनि उदकांत उभी राहिली । तेथें येकि कोल्हि तोंडीं मांसाचा गोळा ठेउन । आपण मछ धरावया गेलि । तंव मछ खोला पाणियांतु गेला । मग मागें पाहे तंव कोल्हि वरतें ससाणेयांकडे पाहों लागली । तें देखे ते नागवी जळांतुन म्हणे । उक्तं च ।

गृध्रेणापहृतं मांसं मत्स्योऽपि सलिलं गतः ।
मत्स्यमांसे परिभ्रष्टे किं त्वं पश्यसि जंबुकि ॥ १० ॥

हें आईकोनि जंबुकी ते नागवीस म्हणे । उक्तं च ।

यादृशं मम पांडित्यं तादृशं द्विगुणं तव ।
न जारो न च भर्ताच जले तिष्ठसि नग्निके ॥ ११ ॥

यैसी कथा सांगों सरली । तंव आणिक येक आचरु आला । तो म्हणे मगरा तुझें घर आणिकें मगरें घेतलें । तें हि आईकौनि विक्राळमुख मगरु दुःख करि । आणि म्हणे । घर भार्या मित्र । तिथें हि गेलीं । तरि आतां तो घरिं रिघाला असे । तयातें सामादिका उपायांमध्यें कोणतो उपावो करूं । म्हणौनि वान्नरातें पुसे । यैसियासि मि काय करूं । तंव तो म्हणे । म्यां तुज दवाडिलें । वारलासि । मि तुज उपाय न सांगें । उक्तं च ।

उपदेशो न दातव्यो यादृशे तादृशे नरे ।
पश्य वानरमूर्खेण सुगृही निर्गृही कृता ॥ १२ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । म्हणे कोण्हे येके वानिं वृक्षिं आविसाळां चिडा चिडि वसे । त्या वृक्षाचां बुढिं येकु वान्नरु । शितकाळिं । तो शीतार्तु । दांत खटखटां वाजत । यैसा येउनि बैसला । तें देखोनि चिडी तयातें म्हणे । तुं घर कां न करिसि । उक्तं च ।

हस्तपादसमायुक्तो दृश्यसे पुरुषाकृतिः ।
शीतवाताहतो मूढ कथं न कुरुषे गृहम् ॥ १३ ॥

तंव वान्नरु ते चिडिस म्हणे । तुं उगी ऐस । तुज काय जाये । तुं उगी राहे । तंव ते पुडति घर करी यैसें म्हणे । तंव तो रागें-जेला म्हणे । उक्तं च ।

सूचीमुखि दुराचारे रंडे पण्डितमानिनी ।
असमर्थो गृहं कर्तुं समर्थो गृहभंजने ॥ १४ ॥

म्हणौनि मूर्खासि उपदेशु नेदावा । तरि तुं मूर्ख । तंव म्हणे । मि सर्वापराधि । तुं साधु आहेसि म्हणौनि मज तुवां उपदेशु द्यावा । तंव वानरु म्हणे । तुं तयासि झुंझ । उक्तं च ।

उत्तमं प्रणिपातेन शूरं भेदेन योजयेत् ।
नीचमल्पप्रदानेन समशक्तिं पराक्रमैः ॥ १५ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । कोण्हे येके वनिं चतुर नामें कोल्हा । तेणें वन हिंडतां । मेला हस्ति देखिला । त्याचें चर्म बळिकट । भेदेना म्हणौनि भोंवताला भोंवतु असे । परि न चाववे । तंव तेथें सिंह्वु आला । तया सिंहासि कोल्हा म्हणे जी हा हस्ती भक्षा । तंव तो म्हणे मि स्वहस्तें प्रत्यक्ष मारुनि खायें । लोकें मारिलें । आणि मेलें । तें मि न खायें । आणिक मृतमांस मज विशेषें खावों नये । म्हणौनि हस्ति तुज दिधला । यैसें म्हणौनियां तो सिंहु गेला । तंव व्याघ्रु आला । तयासि कोल्हा भेद कारि । म्हणे हा हस्ति सिंहें मारिला । तो मी खातु असें । येक वेळ व्याघ्रें । मेला गजु उच्छिष्ट केला । तेणें तो सिंह्वु व्याघ्रावारि कोपला । तैं लागुनि गोसांवी व्याघ्रातें देखौनि मारिती । तरि तुं पळ । सिंहु यावयाचि वेळ झालि असे । यैसें ऐकोनि तो व्याघ्रुहि पळाला । तंव वेउल आला । तयातें देखौनि कोल्हा विचारि । म्हणे याचां दांति चाम भेदैल म्हणौनि तयातें म्हणे । तुं आमुचा अतीथु । सिंह्वु ये तंव तुं खाये । तो तया हस्तिचें चाम फोडी । इतुकेन तो कोल्हा म्हणे सिंहु आला । आतां तुं पळ । तो पळाला । इतुकेन त्याच कोल्हियानें खावों आदरिलें । तंव आणिक येकु कोल्हा आला । तो स्वजाती देखौनि नाभीच । मग तयातें दांतें चाउनि पळविला । हळुहळु येकल्या कोल्हियानें सारा हस्ति खादला तैसें तु करिं । तया सुसरातें तु मारुनि पळवीं । इतुकेनि तुं सुखीं आपुले घरीं राहे । तुं यैसें जरि न करिस । तरि मग तो बद्धमूळ बळिकट होईल । इतुकेन तुज हि नाशु करील उक्तं च ।

सुभिक्षाणि विचित्राणि शिथिलाः पौरयोषितः ।
एको दोषो विदेशस्य स्वजातिर्यद्विरुध्यते ॥ १६ ॥

मगरु पुसे । वान्नरु सांगे । कोण्हे येके गांवीं । चित्रांगदु नामें सुणा । तेथें दुर्भिक्ष पडिलें । गावांतील सुणीं अवघें पोट भरावया गेलीं । तो-हि देशांतरें येका नगरासि गेला । तेथें येकी आळसिणी असे । ते घरींचें कवाड न आडकितां । माहेरासि जाये । तो तियेचिये घरीं रिघोनि नित्य

अन्न खाये । यैसा मोटा जाला । येक वेळ ते घरींहुन निघतां । आणिकिं सुणिं देखिला । तेंहि पारिका म्हणौनि । खादला डसडसों सर्वांगासि खतें पाडीलिं । मग चित्तिं म्हणे । दुर्भिक्ष तरि असे । परि कोण्ही न खाति । म्हणौनि आपुलियां गांवासि आला । तंव गांवींचे अवघें सुणीं वर्तमान पुसिलें । जे परदेशीं कैसी परी असे । तंव तो म्हणे ।

सुभिक्षाणि विचित्राणि शिथिलाः तौरयोषितः ।
एको दोषो विदेशस्य स्वजातिर्यद्विरुध्यते ॥ १७ ॥

यैसें यैकौनि । तो मगरु आपुलिये ठायासि गेला । तेणोंसि युद्ध केलें । आणि तयातें दवडिलें । मग तो आपुले घरीं सुखें असों लागला । इति श्रीविष्णुशर्मविरचिते पंचोपाख्याने चतुर्थं तंत्रं समाप्तम् ।

# पंचतंत्र.

## पंचम तंत्र—अपरीक्षितकार्य.

आतां पांचवें तंत्र सांघिजैल । उक्तं च ।

कुदृष्टं कुपरिज्ञातं दुःश्रुतं दुःपरीक्षितम् ।
तन्नरेण न कर्तव्यं नापितेनेह यत्कृतम् ॥ १ ॥

राजपुत्र पुसति । विष्णुशर्मा सांघे । महिळारोप्य नाम नगर । तेथें मणिभद्र नामें सेटी । तयाचें धन । धर्मकाममोक्षि वेचलें । तंव तो निर्धनु जाहाला । रात्रिं मनिं चिंति जेणें यानें + + + होतों । तो जाइल । यैसें विचारुनि म्हणे । वित्तहिन जिर्णें वोखटें । तरि आतां उपवास करुनियां मरों । तंव तेणें स्वप्निं क्षपणकु येकु देखिला । तंव तो म्हणे मिं शंखनिधि तुझ्या पूर्वजिं उपार्जिलों असें । तरि तूं मरों नको । मि पाहें येणेंचि रूपें तुझिया घरासि येईन । इतुकेनि तुं लांकुड घेउनि मातें डोईवरि हाण । इतुकेनि मि सुवर्णपुरुष होईन । यैसा स्वप्न देखिला । मग तो दिवस उगवलियावरि मनिं चिंतीतु बैसला । मनिं म्हणे साच किं लटिकें । जें मनिं दिसे तेंचि स्वप्निं दिसे । यैसें चिंतितु बैसला असे । तंव त्याचिं नखें फेडावया वारिकु घरासि आला । तो तयाचिं नखें फेडितु असे । तंव तो स्वप्निंचा खपणा आला । तंव तेणें तो घरांतु नेला । आणि वारिकातें नखें फेडावणी बरवी दिधली । आणि त्या म्हणितिलें जे । तुं कोण्हापुढें सांगों नको । तो हो कां म्हणौनि घरासि जाउनि विचारि । म्हणे खपणा मारिलियां सोनें होत असे । म्हणौनियां प्रभातें क्षपणिकांच्या मठासि जाउनि । उत्तरासंगु केला । आणि जीनासी प्रदक्षणा केली । तीन प्रदक्षिणा केलिया । मग दोन्ही गुडघे भुमीस टेंकुनि । आणि वस्त्रें तोंड झांकिलें । हात जोडुनि नमस्कार करी । नमोस्तु वंदे नमोस्तु वंदे म्हणौनि मुख्य क्षपणिकातें म्हणितलें । त्याचा आशिर्वादु घेउनियां म्हणे । गोसांवी सकळां मुनिसहित । माझिया घरासि यावें । तंव तो म्हणतु श्रावकधर्मातें जाणतु असासि । ब्राह्मणां-

चिया परि आमंत्रण करीत असासि । येसें न किजे । मग तो न्हावी म्हणे । मि सकळ हि जाणतु असें । म्हणे तुम्हांलागिं वस्त्रें आणि पोथियांलागिं वेष्टणें । व सिक्षांसि हि वस्त्रें कांहिं द्रव्य । अनेक नाना परिचें । तयां तें पतकरिलें । मग तो न्हावी घरासि जाउनि । खैराचा ठेंगा तासुनि । तो कवाडाआड ठेउनि । तयां क्षपणिकांचि वाट पाहातु बैसला । तंव ते हि अववे त्याच्या घरासि आले । इतुकेनि तेणें ठेंगेयावरि तयांचिया डोया फोडिलिया । ते कितेक मेले । कित्तेक रक्तें भोवाळ बोवात बाहिर आले । तेणें बोभाटें तराळ येउनि तयांतें पुसति । खपणिं अवघा वृत्तांतु सांगितला । मग तो न्हावी धरुनि मारिला । आणि बांधोनि राजसभेसि नेला । मग तयातें सभासद पुसति । तंव तो न्हावी । मणिभद्र सेटिचा वृत्तांतु सांघे । तंव सभासदिं मणिभद्रासि बोलाउनि पुसिलें । तंव येरें आपुला स्वप्निचा आणि अप्रत्यक्ष जाला तो अवघा ( वृत्तांतु ) सांधितला । म्हणति न्हावी कुपरीक्षिकु दुरात्मा सुळि घालावा । मग तो न्हावि रायें सुळि घातला । मग ते सभासद म्हणति । उक्तं च ।

अपरीक्षितं न कर्तव्यं कर्तव्यं सुपरीक्षितम् ।
पश्चाद्भवति संतापो ब्राह्मणी नकुलं यथा ॥ २ ॥

मणिभद्र पुसे । ते सभासद सांगति । म्हणे कोण्हे येके ठाईं देवशर्मा नामें ब्राह्मणु । तयाचिये भार्येसि दोनि लेंकुरें जावळि जाहालिं । येकु मुंगसु । आणि येकु पुत्रु । तीया दोघांतें वाढविलें । परि लेंकुरासि मुंगस मारिल येसें भय असे । येक वेळ ते पाणियासि गेलि । भर्तारातें म्हणे । मि पाणियाचा हेलु आणिन । पाळणां लेंकुरूं आहे । तें पाहात घरिं असा । तो नावेक होता । इतुकेनि कवाड अडकुनि । निश्रया आणावयासि गेला । तंव सापु पाळणेयावरि । वोळकंबतु असे । तो मुंगसें देखिला । तेणें खालिं पाडिला । आणि मारुनि त्याचे तुकडे केले । तंव ते पाणि घेउनि आलि । तंव तें मुंगुस तिये जवळि आलें । तें लाडिजेत मागें पुढें रिंगों लागलें । तयातें पाहे तंव त्याचें तोंड रक्तें माखलें । तें देखौनि न विचारितां । भरलि घागर त्यावरि टाकिली । म्हणे चांडाळा लेंकरुं खादलें । घरांत आलि । तंव लेंकरु पाळणां सुखें असे । सर्पु मारिला असे । तें देखौनि मग रडत बैसलि । तंव तो ब्राह्मणु आला । त्यालें

म्हणे माझें म्हणतीलें न करिसी च । तेणें येसणें दुःख पडलें । तृष्णा अपार करितां ऐसें जालें । उक्तं च ।

अतिलोभो न कर्तव्यो लोभं नैव परित्यजेत् ।
अतिलोभाभिभूतस्य चक्रं भ्रमति मस्तके ॥ ३ ॥

ब्राह्मणु पुसे । ब्राह्मणि सांगे । कोण्हे एके स्थानिं ब्राह्मण चौघे मित्र । ते दरिद्रातें पावते जाहाले । विचारिति म्हणती धनेंवीण जिणें कांहिं नाहिं । निर्द्धनातें आंबुलि लोक आणि सोईरे गोंसावि नमानिति । यैसा तो अर्थ सर्व प्रकारें मिळे यैसें किजे । तरि वाणिज्य अवघेया उदिमांत भलें । जें त्यासि अपावो नाहिं । आणि दुणें तिगुणें होय । यैसें विचारुनि देशांतरें चौघेहि चालिले । तंव अवंति देश पावले । तेथें नदिस स्नान केलें । पुढारे जाति तंव भैरवानंदु योगी तो सन्मुख भेटला । तयातें नमस्कारुनि त्याचिया मठासि गेले । तंव तो पुसे तुम्हि कोण । कोठें जात असां । तंव ते म्हणति आम्हि सिद्धिलागिं जात असों । विवरप्रवेशो । शाकिनीसाधन । स्मशानसेवा । महामांसविक्रयो । परि द्रव्यउपावो साधणें । तयांचा निर्धारु उद्यमीं यैसें जाणौनु । चौघांसि प्रत्येक प्रत्येक वाति दिधलिया । म्हणे ज्याचि वाति जेथें विझेलि पडैल । तेथें चि तया सिद्धि । हिमाचळासि जाउनि त्याचे उत्तरविभागिं चालावें । तेथें त गेले । पुढां जात होता त्याचि वाति पडलि । तेथें चि तेणें खणितलें । तंव तांबें देखिलें । तो म्हणे तांबें अपार घेवों । येर तिघे म्हणति आम्हि पुढारे जावों । तो तांबें घेउनि देशासि आला । पुढति जातां दुसरियाचि वाति विझली । तेथें चि तेणें खणितिलें । तंव रुपें देखिलें । तंव म्हणे रुपें अपार घेवों । येर दोघे म्हणती आम्हि पुढारें जावों । तो रुपें घेउनि देशासि आला । तंव पुढति जातां तिसरियाचि वाति विझलि । तेथें खणतां सोनें देखिलें । तो म्हणे अपार सोनें घेवों । आणि आपण दोघेहि देशासि जावों । तंव चवथा म्हणे पुढें जातां येकाहुनि येक अधि [ क ] उत्तम वस्तु पाविजेते । तरी मी पुढां जाईन । तंव सुवर्णसिंधु म्हणे अरे मित्रा । सुवर्णाहुनि परता आणिक लाभु नाहिं । सुवर्णाहुनि आणिक धातु थोर नाहिं । तरि येथुन च सुवर्ण घेउन दोघे हि देशासि जावों । तंव येरु म्हणे मि पुढति जाईन । वस्तु

घेउनि येईन । तंव तुवां माझि वाट पहावि । मग आपण दोघेहि सांगातें चि देशासि जावों । यैसें म्हणौनि त्यासि तेथें चि राहुन । आपण पुढता निघाला । हिंडतां तान्हेला पाणि पाहे तंव येकाचिये डोईवरी । चाक भोवतां देखिलें । तो रक्तें माखला देखौनियां म्हणे । तुझे डोईचें चाक काईसें । मि तान्हेलों पाणि सांग । यैसें बोलत खेवों । त्याचे माथांचें चाक । येराचिये माथां बैसलें । येरु म्हणे मज हि यैसेंचि जाहालें । म्हणे जो सिद्धवाति घेउनि येतो । तो चक्रकारेंसि बोलतखेवों । यैसें चि होये । तंव तो म्हणे भक्ष कैसें । तंव येरु म्हणे भुक ताहान येथें जरा नाहिं । यैसें दुःख भोगिजेत असे । यैसें म्हणौनि तो निघाला । येरु चाक डोइये आणि रक्तें माखला रड । तंव सुवर्णसिंधु म्हणे । मित्र कां आझुनि न ये चि । म्हणौनि त्यासि पाहावयासि जाये । तंव तो तैसा देखिला । म्हणे मित्रा तुज यैसें कां जाहालें । तेणें त्या चक्राचा वृत्तांतु सांगितला । तो म्हणे तुतें म्यां वारिलें । तुं पुढारा जांवों नको । सोनियापरतें आणिक उत्तम नाहिं । परि माझें वचन तुं नाइकेसि च । यैसा तुं बुद्धिहिनु । उक्तं च ।

वरं बुद्धिर्न सा विद्या विद्यातो बुद्धिरुत्तमा ।
बुद्धिहीना विनश्यन्ति यथा ते सिंहकारकाः ॥ ४ ॥

चक्रधरु पुसे । सुवर्णसिंधु सांगे । म्हणे चौघ जण मित्र । तिघ जण विद्यावंत । आणि एकु जण बुद्धिवंतु । परि त्यासि विद्या नाहिं । ते देशाउं धन जोडावयासि निघाले । येकु म्हणे विद्या नाहिं तो दवडुं । येणें काइ करिजैल । तंव एकु म्हणे हा धाकुटपणापासुनि बाळमित्रु असे । तव प्रातःकाळि वाटेसि जातां वाघाचि हाडें देखौनि म्हणति । तिघांचिये विद्येचि परीक्षा पाहों । म्हणौनि यथास्थानिं अस्थि मेळविल्या । येकें त्वचा नखें रुधिर केलें । यैसा जाला । तंव तिसरा म्हणे मि आतां या वाघासि जीववीन । तंव बुद्धिवंतें वारिलें । म्हणे व्याघ्र जीतखेवों । अवघीयांतें खाईल । तंव तो म्हणे इहिं आपुलिया विद्या दाखविलिया । मी केंवि न दाखवीन । मि का येयांपरिस विद्येहीनु । तंव बुद्धिवंत म्हणे हा वारिलें नमनी । परि आतां मारिजति । म्हणौनि आपण वृक्षावरि वळंघला । तेणें व्याघ्रासि जीववीतखेंवों । ते तीघे हि खादले । बुद्धिवंतु वांचला ।

म्हणौनि बुद्धि भलि । तंव चक्रधरु म्हणे । मिं दैवहतु । परि बुद्धिवंतु हि नाशु पावे । दैव असे तरि स्वल्पबुद्धि हि सुखें असे । उक्तं च ।

शतबुद्धिः शिरस्थोऽपि लंबते च सहस्रधीः ।
एकबुद्धिरहं भद्रे क्रीडामि विमले जले ॥ ५ ॥

सुवर्णसिंधु पुसे । चक्रधरु सांगे । येके डोहिं सहस्रबुद्धि शतबुद्धि येकुबुद्धि यैसे तिघ मासे । होते । येके दिवसिं पारधि तियां वाटा जातां । तो डोहो देखौनि बोलिला । म्हणे ये डोहिं मासे अपार असति । तरि उदैक येथें पारधींये खेळों । हा बोलु वज्रपातु यैसा आईकोनि । तिघे मित्र विचारिति । येकुबुद्धि म्हणे येथुनि जाईजे । तें निकें । येर दोन्हि म्हणति हा ठावो आमुचा वहुत काळांचा असे । हा सांडिजेना । म्हणे पारधी येईल । ते वे सिबु करुं । म्हणौनि राहिले । तंव रात्रिं येकुबुद्धि आपुलिये स्त्रिसहित आणिके डोहासि गेला । तंव प्रभाते पारधी आला । तेणें डोहिं जाळं घालुनि अवघे मासे मारिले । सहस्रबुद्धि डोईवरि ठेविला । शतबुद्धिचे तोंडिं लव्हा सिरिल । वोळंबीतु नेला । तयातें नेतां देखौनि बेडुक बेडुकीतें म्हणे ।

शतबुद्धिः शिरस्थोऽपि लम्बते च सहस्रधीः ।
एकबुद्धिरहं भद्रे क्रीडामि विमले जले ॥ ६ ॥

म्हणौनि सांगितलें बुद्धि नाइके त्यासि यैसें होय । उक्तं च ।

साधु मातुल गीतेन वारितो न मया स्थितः ।
अपूर्वोऽयं मणिर्बद्धः संप्रातिर्गीतलक्षणम् ॥ ७ ॥

चक्रधरु पुसे । सुवर्णसिंधु सांगे । कोण्हे येके गांविं उधरु नामें गाढउ परिटाचा । दिवसां भारु वाहे । रात्रिं भलेतें ठायीं चरे । तयासि कोल्हा मित्रु जाहाला । तेहिं दोघीं राणा सांडिलें । रात्रिं मळा रिघोनि । काकडिया आणि उंस भक्षिति । येके दिवसिं मळां रात्रिं चरतां । गाढउ कोल्हीयातें म्हणे । भाचेया मिं गावों बरवें जाणें । तुं आईक । मि आतां गाईन । तंव कोल्हा म्हणे तुझा शब्द कर्कश । आणि आपण या मळां चोरिं निघालों असों । माळि आईकेल । तरि तो येथें येईल । आणि धरुनि टोणपेवारि मारिल । तंव तो

गाढउ म्हणे । मी सुस्वरें हळु चि गाईन । तंव कोल्हा म्हणे आतां मज निघावा खिडियेरें वाडि पाहों दे । मग तुं गाये । तंव तो कोल्हा खिडि पाहावयासि गेला । इतुकेनि तो गाढउ तोंड वरुतें करुनि भुकिनला । तंव ते राखणाईत तेहिं गाढव वोढाळ यैसें जाणउन । तेथें आला । तेणें त्या गाढवास लांकुडवारि मारून । मोटिचें । चाक त्याच्या गळां बांधिलें । मग तो वाड वेळां सावधु जाला । तंव तो कोल्हा शुद्धिस आला । तेणें म्हणितलें । मामो हें तुझें योग्यतेचें लक्षण । माझें वारिलें नाईकेसि च । तैसा तुं माझें वारिलें न करिसि च । तंव चक्रधरु म्हणें । तुवां म्हणितलें साच । मित्राचें म्हणितिलें न करि त्यासि यैसें होय । उक्तं च ।

यस्य नास्ति स्वयं प्रज्ञा मित्राणां न करोति यः ।
स एव निधनं याति यथा मंथरकौलिकः ॥ ८ ॥

सुवर्णसिंधु पुसे । चक्रधरु सांगे । कोण्हे येके ठाईं मंथरनामें कोळिकु । तो लांकुडें तोडावयासि राणासि गेला । चिंचेचा वृक्ष समुद्र थडियेसि मोटा थोरु देखिला । तो तेणें तोडुं आदरिला । तेथें वेत्तरु नामें सिद्ध वसे । तेणें तयासि म्हणितलें तुं हा वृक्ष तोडुं नको । मि येथें वसें । येरु म्हणे हा वृक्ष बरवा । मि हट्टें तोडिन । तंव वेत्तरु म्हणे तुं मागसिल तें देईन पारि हा वृक्ष तोडुं नको । तंव कोळिकु बोलिला जें मि मित्रासि आणि भार्येसि पुसोनि येतों । तंव तो म्हणे जाये । तंव तयाचा मित्रु वारिकु । तयातें पुसें म्हणे मज वेत्तरु प्रसन्न जाहाला असे । तारि तयासि मि काये मागों । तंव तो वारिकु म्हणे । तुं राज्य माग । तुं राजा । आणि मि मंत्री । येणें प्रकारिं सुखें असों । तंव तो म्हणे मि भार्येतें पुसैन । तंव वारिकु म्हणे । स्त्रियेतें मंत्रु न पुसिजे । तंव तो म्हणे ते परमपतिव्रता असे । म्हणौनि भार्येतें पुसों गेला । तियेतें म्हणें मज वेत्तरु प्रसन्न जाला असे । तारि मि काय मागों । माझा मित्र न्हावी तो म्हणतो राज्य माग । तारि तुं काय म्हणतेसि । तंव ते म्हणे न्हावी काये जाणे । रायासि कैंचें सुख । आणि बहुत वेसनें । तारि तुं राज्य मागों नको । आणिक येक सिर । आणिक दोनि हात । इतुकें माग । यैसें तुज दोनि सिरें आणि च्यारि हात होतिल । इतुकें

जालिया तुं अपार वोझें आणिसिल । आणि उदंड काम करिसिल । मग बहुसाल खावयासि हि मिळेल । तो तिचे बोलें हरिखेला । म्हणे बरवें बोलिलिस । मग तेणें त्या वेत्तरासि तैसें चि मागितलें । तेणें त्याचें इच्छित तें त्यासि दिधलें । तो गावांत येतां लोकिं देखिला । तो राक्षस म्हणौनि लोकीं दगडवरि मारिला । तरि तो मित्राचें शिकविलें नाईके चि । तयासि यैसें जालें । आणि स्त्रिबुद्धि असंभाव्य । स्वार्थ न करावा । असंभाव्य चिंतिजे तरि यैसें होय । उक्तं च ।

अनागतवतीं चिंतामसंभाव्यां करोति यः ।
स एव पांडुरः शेते सोमशर्मपिता यथा ॥ ९ ॥

सुवर्णसिंधु पुसे । चक्रधरु सांगे । म्हणे कोण्हे येके गांवीं स्वभावकृपणु नामें ब्राह्मणु । तो सातुचें पीठ खाये । उरलि कणिक ते सिंकां ठेवि । यैसी घडुलि तोंडवरि भरिलि । रात्रि खाटेवरि निजेला । वरि सिंकांतें सातुचि घडुलि ठेविलि असे । बुद्धिं आपण निजोनि चिंतुं आदरिलें । म्हणे घडुलि तरि सातुनें भरलि असे । ते दुकळिं रूप-टंके दोंसि विकिन । त्याच्या सेळीया दोनि घेईन । त्या सां मासां वीतील । इतुकेनि बहुत होतिल । त्या विकुनि येकि गाये घेईन । मग ते गाईस गोऱ्हे होतिल । काल्हवाडि वहुत होतिल । त्या गाई विकुनि म्हैसि घेईन । त्याहिं पडुलि वाढेलि । त्या म्हैसि वीकोन घोडी घेईन । तंव ते घोडियेसि सिंगरें बहुत होतिल । ते हि विकुन बरवं घर करीन । इतुकेनि मज बरवीसि रूपवंति कोण्हीं कन्या देईल । तिस पुत्र होईल । त्यासि सोमशर्मा नाव ठेविन । तंव मि घोडशाळेसि घोडियांचिं लक्षणें पाहात असैन । तंव तो सोमशर्मा रिंगतु रिंगतु मजपासि येईल । तेव्हां मि ब्राह्मणितें म्हणैन जे । तुं हें लेंकुरुं घे । ते व्यासंगें नाईकेल । आणि लेंकुरुं नेघेल । तरि मग मि ते वेळेसि रागेंकरि उठोनि । तीतें पांपरा । हाणैन । म्हणौनियां पांपरा ते सातुचे घडुलिस हाणितिलि । ते खालिं पडिलि । फुटोनि खापरें वेगळालिं जाहालिं । मग ते सातु तोंडावरि आंगावरि सोडालि । अवघा पांढरा च जाहाला । तरि अनागत चिंति तया यैसें होये । तंव सुवर्णसिंधु म्हणे हें सत्य । परि लौल्य वोखटें । उक्तं च ।

यो लौल्यात्कुरुते कर्म न चानर्थमपेक्षते ।
विडंबनामवाप्नोति स यथा चंद्रभूपतिः ॥ १० ॥

चक्रधरु पुसे । सुवर्णसिंधु सांगे । कोण्हे येके नगरीं चंद्रकांतु नामें राजा । तेणें आपुलिया कुमारासि । कौतुकें खेळावया । वान्नरयुथ आणि मेंढियांचें युथ पोसिलें । तयांतु येकु मेंढा भाणवासिं निघोनि अन्न खाये । सुआरु बटिकि रागें हाणिति । परि तो वोढाळिंवं न संडि । तें देखौनि मुद्गलु वान्नरु म्हणे । मेंढियासि आणि सुआरासि न पडे । हें तरि निकें नव्हे । मग आपुलिया वान्नरांतें म्हणे । बाळेंहो येथुनि वनासि जावें । मेंढियासि आणि सुआरवा वैर लागलें असे । त्यांचेनि संगें नाशु पाविजेल । परि तें वान्नरें याचा बोल नाईकेति च । मग तो वान्नरु येकला चि गेला । तंव येकें दिवसिं । मेंढा वोढाळु निघाला । भाणवसिं । तंव ते सुआरेनं जळत भीतेन हाणितिलें । त्या मेंढियाचे लोहकरिस आगि लागलि । तेणें त्या घोडशाळेसि आगि लागलि । घोडे पोळले करपले । मग रायें वैद्यासि औषध पुसिलें । तंव वैद्य म्हणे । वान्नरें मारुनि तेल केलिया घोडे बरवे होतिल । मग रायें वान्नरें मारावया निरोप दिधला । मग अवघीं वान्नरें मारुनि तेल केलें । त्याणें घोडे बरवे जाहाले । तें परस्परें तेणें वान्नरें आईकिलें । मग तो दुःख करी । येक वेळ तो वान्नरु तान्हेला । येका सरोवरासि पाणि प्यावयासि गेला । तंव तेथें राक्षसाचीं पाउलें रिघतिं देखिलिं । निघतिं नेदखे चि । मग मनिं विचारि । या सरोवरिं । दुष्ट प्राणि असे । म्हणौनि कमळनळें दुरुनि पाणि घेतलें । तें देखौनि दिव्यरत्नमाळासहित । राक्षसु सरोवराबाहिर निघाला । म्हणे अरे वान्नरा या सरोवराआंतु जो कोण्हि रिघे । तयातें मि खायें । तंव वान्नरु पुसे । ऐसे तुवां कित्येक खादले । तो म्हणे लक्ष कोटि खादले । परि आजि तुज प्रसन्न जाहालों । तुं वरु माग । तंव तो वान्नरु म्हणे । माझा वैरि येकु राजा असे । तरि तुं आपुलि माळा मज दे । इतुकेनि त्यातें भुलउनि मि येथें आणिन । आणि या सरोवरिं घालिन । इतुकियानि तुं तयातें खाये । तंव त्या राक्षसें हो कां म्हणौनि आपुली माळा दिधलि । वान्नरु ते माळा घेउनि । रायापासिं आला । तंव तो राजा म्हणे हे माळा कैंचि । मग म्हणे राजा सुचां अर्द्धोदकिं । सरोवरिं स्नान करि ।

तयासि कुबेरु रत्नमाला देतु असे । तंव राजा म्हणे सरोवरु आम्हांसि दाखवी । वान्नरु म्हणे बहु बरवें दाखवीन । इतुकेनि सहपरिवारिं रावो निघाला । तेथें प्रातःकाळिं अहर्बिंबसमई सहपरिवारिं । स्नान करावयासि सरोवरिं निघाला । तंव त्या वान्नरें रावो येकला राहाविला । वाड वेळु जाहाला । परि कोण्हि बाहिर न निघति च । मग रावो वान्नरातें म्हणे । ते अद्यापि कां न येति च । तंव तो उडौनि वृक्षावरि बैसला । मग रायातें म्हणितिलें । तें अवघीं राक्षसें खादलिं । तुं गोंसावी म्हणौनि म्यां राखिलासि । तरि तुंवा माझें अवघीं वान्नरें कां मारिलिं । तंव राक्षस सरोवराबाहिरी निघौनि म्हणे । उक्तं च ।

हतः शत्रुः कृतं मित्रं रत्नमाला न हारिता ।
नालेन पिबता तोयं भवता साधु वानर ॥ ११ ॥

या कारणें अतिलौल्य निकें नव्हे । मग सुवर्णसिंधु म्हणे । मातें देशासि पाठविं । मि आपुलिया घरासि जाईन । तंव चक्रधरु म्हणे । मातें येसेयासि तुं कैसें सांडुनि जासि । तंव तो म्हणे तुझी अवस्था माझेनि न फिटे । तंव तो म्हणे हें साच । परि हें स्थान मनुष्यां अगम्य मज राहिलिया । तुझेपरि होईल । उक्तं च ।

यादृशी वदनच्छाया दृश्यते तव वानर ।
गृहीतो शीतकालेन यः परेति स जीवति ॥ १२ ॥

चक्रधरु पुसे । सुवर्णसिंधु सांगे । कोण्हे येके नगरिं । भद्रसेनु नामें राजा । तयाचि कन्या रूपवंति । तियेचें नाम रत्नावति । तियेतें राक्षसु रात्रि येउनि भोगि । परि नेवों न शके । राखणाईत अपार । तो रात्रि भोगुं सरे । इतुकेनि तिस ज्वरु ये । येसें चि तीस नित्य होये । येके दिवसिं गुप्त घराचे कोनिं राहौनि । तितें न्यावयासि विचारु करित बैसला असे । तंव ते राजकन्या आपुलिये सखितें म्हणे । मातें विकाळ समयिं हा राक्षसु येउनि कर्दमु करितुसे । म्हणौनि अन्यावो न करावा । मग तो पुसौनि आपुलिया देशा घरासि गेला । म्हणौनि ते ब्राह्मणि त्या

ब्राह्मणातें म्हणे । या कारणें म्हणितिलें करावें । तंव सभासद म्हणीति । अपरीक्षित कार्य न करावें । मग तो ब्राह्मणु । आणि ते ब्राह्मणी । मुंगसाचें दुःख विसरौनि सुखें राहिलिं । आणि तो मणिभद्र सेटि खवणा स्वप्निचा मारिला । तो हि आपुलिया घरासि गेला । यैसिं पांच हि तंत्रें विष्णुशर्मेनें राजपुत्रांसि सांगितलिं । तेणें ते नितिवंत राज्ययोग्य जाहाले । मग राजेयानिं विष्णुशर्मियासि बरवा सन्मानु केला । आणि दोनि गांव दिधले । लेणिं लुगडिं दिधलिं । हे कथा जो आईके । तयासि । धर्म । अर्थ । काम । मोक्ष । होय । आणि बुद्धि बरवी होये । प्राज्ञ होये क्षेत्रियांसि रणिं विजय होये ।

इति श्रीविष्णुशर्मविरचितं पंचोपाख्याने पंचमां तंत्रं समाप्तम् ।



---